






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

मराठी अभ्यास परिषद पत्रिका

# भाषा आणि जीवन

संपादन-समिती: विजय पाध्ये (कार्यकारी संपादक), आनन्द काटीकर, सरोजा भाटे, सलील वाघ, विजया चौधरी

मराठी अभ्यास परिषद पत्रिका हे त्रैमासिक मालक, मराठी अभ्यास परिषद ह्यांच्यासाठी, मुद्रक व प्रकाशक आनन्द काटीकर ह्यांनी एकविरा प्रकाशन व प्रसिद्धी सेवा, सर्व्हे क्र. 1/27+29, माउली सोसायटी, विठ्ठल-मंदिरामागे, कर्वेनगर, हिंगणे, पुणे 411 052 येथे छापून बी-5/16, सनसिटी, सिंहगड रस्ता, आनंदनगर, पुणे 411 051 येथे प्रसिद्ध केले. कार्यकारी संपादक: विजय पाध्ये. स्थिरभाष क्र. (020)2441 1951; चलभाष क्र. 98220 31963. ई-पत्ता: marathi.abhyas.parishad@gmail.com

| **वार्षिक वर्गणी** | **एक वर्ष** | **तीन वर्षे** | **पाच वर्षे** |
|---|---|---|---|
| व्यक्तींसाठी | ₹१५०/- | ₹४००/- | ₹७००/- |
| संस्थांसाठी | ₹२००/- | ₹५५०/- | ₹९००/- |

सुट्या अंकाची किंमत ₹४०/-. कोणत्याही अंकापासून वर्गणीदार होता येते.

**मराठी अभ्यास परिषदेचे आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) शुल्क ₹२०००/- + नोंदणी शुल्क ₹१००/-**. आजीव सदस्यांना पत्रिकेचा अंक पाठवला जातो.

वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, थेट (ऑनलाईन) भरणा करून (बँक ऑफ महाराष्ट्र, टिळक रस्ता शाखा, पुणे; बचत खाते क्र. 20057164260; IFS Code MAHB0000041) देता येईल. धनादेशाने द्यायची असल्यास धनादेश **'मराठी अभ्यास परिषद'** ह्या नावाने काढावा. पुण्याबाहेरील कोणत्याही बँकेचा वा शाखेचा असल्यास व 'अॅट पार' वटणारा नसल्यास वटणावळ म्हणून धनादेशाच्या रकमेत ₹५०/- भर घालावी. वर्गणीदारांनी कोणत्याही प्रकारे रकमेचा भरणा करताच परिषदेस पत्राने किंवा ई-पत्राने, किंवा 094216 10704 वा 099236 71820 ह्या चलभाष क्रमांकावर लघुसंदेश पाठवून आपले नाव, पत्ता, रक्कम, वर्गणी कोणत्या अंकापासून/वर्षापासून घ्यावी ते कार्यवाहीच्या प्रक्रियेसाठी कळविणे आवश्यक आहे.

**जाहिरातीचे दर:** पूर्ण पान ₹२,५००/-, अर्धे पान ₹१,५००/-, पाव पान ₹८००/-, शुभेच्छा ₹४००/-, आवरण पृष्ठ तीन ₹३०००/-.

प्रकाशन: त्रैमासिक; जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी).

---

सूचना: (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या वा लेखकांच्या मतांशी संपादक वा परिषद सहमत असतीलच असे नाही. (२) **ह्या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि, ह्या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्यसंस्कृती मंडळ वा राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

**ह्या अंकाची किंमत ₹४०/-**



अनुक्रमणिका

## अनुक्रम


| | | पान |
|---|---|---|
| **संपादकीय** | | |
| आणखी एका प्रज्ञासूर्याचा अस्त | विजया चौधरी | ५ |
| **लेख** | | |
| भाषाशुद्धी | दिवाकर मोहनी | ९ |
| समृद्ध मराठीसाठी... | द०ता० भोसले | १७ |
| स्पर्धा परीक्षेतील मराठी भाषा : वास्तव आणि अपेक्षा | दत्तात्रय घोलप | २० |
| सलील वाघांची काव्यभाषा आणि भाषाकाव्य | नीती बडवे | २३ |
| यशवंतराव कानिटकर : मूर्तिमंत सौजन्यमूर्ती | वि०दा० सामंत | ३९ |
| मराठी ग्रंथसूचिकार शरद केशव साठे | सुशान्त शंकर देवळेकर | ४२ |
| **महाजालावरील मराठी** | | |
| समर्थरामदास४००.इन | श्रद्धा काळेले | ४५ |
| **ई-शब्दचर्चा** | | |
| उटपटांग | | ४७ |
| **पुनर्भेट** | | |
| परभाषेंतील शब्दांची योजना | विष्णुशास्त्री चिपळूणकर | ५५ |
| **दखलयोग्य** | | |
| १. गावभाषा-आम्हां घरी धन! | केशव सखाराम देशमुख | ५८ |
| २. बोली भाषांच्या संवर्धनासाठी | इरगोंडा पाटील | ६० |
| ३. शिक्षण, साहित्य व समाज | संदीप वासलेकर | ६२ |
| **ज्याची त्याची प्रचीती** | | |
| डिंगोऱ्यातील विद्यार्थी इंग्रजीकडून मायबोलीकडे | संजय डुंबरे | ६६ |
| **परिषद-वार्ता** | | |
| अठराव्या वार्षिक सर्वसाधारण सभेचे इतिवृत्त | आनन्द काटीकर | ७० |
| एकोणिसाव्या वार्षिक सर्वसाधारण सभेचे इतिवृत्त | आनन्द काटीकर | ७२ |

**भाषा-वार्ता**
१. 'मराठी' आता महाराष्ट्राची अधिकृत राजभाषा ७४
२. ग्रंथालयातर्फे शब्दशोध स्पर्धा ७४
**साद-प्रतिसाद**
१. सारंगांच्या 'एका कोळियाने'वरील परखड परीक्षणासंबंधी ७५
२. कॅरेट ... ७५
**पानपूरके** ४, १६, १९, ३८, ४४, ५४, ५७, ६९, ७६
**लेखक-परिचय** ७७
**मुखपृष्ठाविषयी...** ७९
**चित्रकार :** : सलील वाघ

## खुलासा

'भाषा आणि जीवन'च्या 'केळकर विशेषांका'साठी लेख लिहिण्याची आम्ही अरुण खोपकर ह्यांना विनंती केली होती. परंतु 'आपले वाङ्मयवृत्त'साठी केळकरांसंबंधी लेख लिहिलेला असल्यामुळे आणखी एखादा लेख लिहिणे आपल्याला शक्य होणार नाही असे ते म्हणाले आणि 'आपले वाङ्मयवृत्त'मधीलच लेख पुनर्मुद्रित करावा असे त्यांनी सुचवले. पण 'भाषा आणि जीवन'च्या 'केळकर विशेषांका'चे सूत्र वेगळे असल्यामुळे खोपकरांची सूचना मान्य करणे आम्हांला प्रशस्त वाटले नाही. तरीही त्या लेखातील काही परिच्छेद पानपूरके म्हणून वापरण्याचे आम्ही ठरवले. त्यासाठी खोपकरांनी संमती दिली ह्याबद्दल, उशिरा का होईना, त्यांचे आम्ही आभार मानतो.

- प्र॰ना॰ परांजपे
प्रमुख संपादक, 'भाषा आणि जीवन', 'केळकर विशेषांक'



संपादकीय

# आणखी एका प्रज्ञासूर्याचा अस्त

विजया चौधरी

साहित्य-समीक्षेच्या क्षेत्रात स्वयंप्रज्ञेने आपली ठाशीव नाममुद्रा उमटवणारे डॉ॰ द॰भि॰ कुलकर्णी यांचे नुकतेच निधन झाले. मराठी अभ्यास परिषदेशी त्यांचे जिव्हाळ्याचे संबंध होते. 'भाषा आणि जीवन'च्या 'डॉ॰ अशोक केळकर विशेषांका'साठी त्यांनी लिहिलेला 'भारतीय साहित्यशास्त्र आणि अशोक केळकर' या शीर्षकाचा लेख, हा त्यांचा परिषदेबरोबरचा अखेरचा ऋणानुबंध ठरेल असे वाटले नव्हते.

दभिंची लेखणी कथा, ललितलेख, समीक्षा या साहित्यप्रकारांत सारख्याच रसिकतेने रमते. त्यांनी स्फुट लेखनही केलेले आहे. उदा॰ 'पस्तुरी' (२००२). त्यांच्या बऱ्याचशा लेखांना नियतकालिकांमधून अथवा वृत्तपत्रांमधून पूर्वप्रसिद्धी लाभलेली आहे. काही लेख जुन्या संग्रहांतून पुन्हा नव्याने पुनर्मुद्रित झालेले आहेत. उदा॰ 'कादंबरी : स्वरूप व समीक्षा (२००३) ह्या पुस्तकात समाविष्ट केलेले 'रणांगण'वरचे दोन्ही लेख अनुक्रमे 'ललित' दिवाळी ९३, व 'तरुण भारत' ३०मे - ६जून १९७१ मध्ये प्रसिद्ध झालेले आहेत. (प्रत्येक ठिकाणी पूर्वप्रसिद्धीची नोंद असेलच असे नाही.) असे असले तरी त्यांचा लेखनपिंड हा समीक्षकाचाच असल्याने आस्वादाकडून समीक्षेकडे आणि समीक्षेकडून तात्त्विक मांडणीकडे त्यांचा प्रवास होत राहतो. कलाकृतीतून रसिकाकडे संक्रमित होणारी आशयाची, अनुभवाची मानसगोचरता हा त्यांच्यासाठी उत्स्फूर्ततेचा क्षण असतो.

त्यांनी उपयोजित आणि सैद्धांतिक असे दोन्ही प्रकारचे समीक्षा लेखन केलेले आहे. साहित्यकृतीविषयी वाटणाऱ्या आंतरिक ओलाव्यातून आणि आत्मप्रत्ययाला अनुसरून ते समीक्षालेखन करतात. समीक्षेसाठीचा वाटाड्या स्वतः ती कलाकृतीच असते असे ते मानतात. लेखकाची निर्मितिशक्ती, शब्दकृती आणि आपली आस्वादशक्ती एकरूप झाली की आपल्या मनात कलाकृती साकार होते असे त्यांनी म्हटले आहे. (पस्तुरी, पृ॰ २९). जसे ते साहित्यकृतीचे रसग्रहण करत करत सहजपणे त्यामागच्या तात्त्विक विचाराकडे वळताना दिसतात; तसे कधी कधी ते आधी मुक्तचिंतन करून मग त्यानुसार कलाकृतीचे रसग्रहण करतात. उदाहरणच द्यायचे झाले तर आनंदीबाई शिर्के यांच्या 'सांजवात'वर लिहिताना आधी 'आत्मचरित्र' ह्या साहित्यप्रकाराविषयीचे त्यांचे चिंतन येते. (पस्तुरी, पृ॰ १२७) त्या त्या कलाकृतीबद्दल

लिहिताना ते त्यांचे नवे आकलन वाचकांपुढे ठेवत असतात. 'चार शोधनिबंध' (१९७७) ह्या पुस्तकात त्यांनी 'अध्यात्मनिष्ठ साहित्याच्या प्रचलित आकलनाला' पूर्णता देण्याचा प्रयत्न केला आहे. ह्यात श्री चक्रधर, श्री ज्ञानेश्वर, श्री नामदेव ह्यांच्या अध्यात्मनिष्ठ साहित्याबरोबरच कवी बींच्या 'चाफा' या कवितेचाही समावेश केला आहे. 'चाफा'वरील मतमतांतरांचे खंडन न करता त्यांनी 'संशोधननिष्ठ आकलन' सादर केले आहे. 'चाफा' ही कविता 'चाफ्याची' नसून चाफ्याचे हृदयपरिवर्तन घडवू पाहण्याच्या प्रयत्नात आपलेच हृदयपरिवर्तन घडवून बसलेल्या 'मी'ची कविता आहे, अशी आशयाची अभिनव उकल त्यांनी करून दाखवली आहे. दभिंच्या विकसित समीक्षादृष्टीचा मूलस्रोत शोधण्यासाठी आपल्याला त्यांच्या 'महाकाव्या'विषयीच्या प्रबंधाकडे जावे लागते. 'महाकाव्य' ह्या वाङ्मयप्रकाराचा तंत्रदृष्ट्या व ऐतिहासिकदृष्ट्या अभ्यास आणि मराठीतील प्राचीन व अर्वाचीन पद्य व गद्य महाकाव्यांचा सर्वांगीण विकास ह्या विषयावरचा प्रबंध त्यांनी १९६६मध्ये नागपूर विद्यापीठाला सादर केला होता. बाराशे पृष्ठांच्या आणि दोन हजारहून अधिक वर्षांचा काळ कवेत घेणाऱ्या या बृहद्प्रबंधाचे साररूप, त्यांच्या 'महाकाव्य : स्वरूप व समीक्षा' (१९७५) ह्या ग्रंथामधून अभ्यासता येते. त्यांच्या समीक्षेवर संस्कृत साहित्यशास्त्राचा प्रभाव दिसतो त्यामागे त्यांच्या ह्या अभ्यासाचे मोठे अधिष्ठान आहे. संस्कृत महाकाव्य, प्राकृत महाकाव्य, पाश्चात्य महाकाव्यविचार, आद्य पाश्चात्य महाकाव्य, मराठी महाकाव्यविचार अशा सर्व विचारधारांचे परिशीलन करून त्या आधारे त्यांनी काही निष्कर्ष मांडले आहेत. त्यांनी महाकाव्य हा एक वाङ्मयप्रकार मानून पद्य आणि गद्य महाकाव्यांचा स्वतंत्रपणे विचार केला आहे. खंडात्मक ऐतिहासिक कादंबरीची त्यांनी महाकाव्याच्या संदर्भात समीक्षा केली आहे. 'ऐतिहासिक कादंबरीचे संभाव्य अभिजात रूप मान्य झाले तर वर्तमान काळातही मराठीत खरीखुरी महाकाव्ये दृष्टोत्पत्तीस येतील' (महाकाव्य : स्वरूप व समीक्षा, पृ० १९९) असा विश्वास त्यांनी व्यक्त केला आहे. महाकाव्य आणि कादंबरी यांचा तुलनात्मक विचार दभिंच्या पूर्वी कोणी केला नसावा.

त्यांनी मांडलेला समीक्षाविचार एकत्रितपणे समोर येतोच असे नाही. वेगवेगळ्या लेखांमधून किंवा एखाद्या कलाकृतीच्या केलेल्या परिशीलनातून त्यांची लेखणी काही सैद्धांतिक विवेचन मांडताना दिसते. उदा० त्यांच्या 'प्रतीतिभेद' ह्या पुस्तकातील 'समीक्षा व निबंध' ह्या पहिल्याच लेखात समीक्षा आणि निबंध यांतील भेद स्पष्ट करताना, ते डॉ० रा०शं० वाळिंबे, डॉ० रा०भा० पाटणकर, प्रा० म०वा० धोंड ह्यांच्या लेखनाला 'समीक्षामूल्यांचा स्पर्श होत असला तरी ते समीक्षक नसतात तर निबंधकार असतात' असे म्हटले आहे. ह्याचे स्पष्टीकरण देताना, निबंध हा लेखकाच्या बौद्धिक शक्तीचा आविष्कार असतो, त्यांना त्यासाठी कोणताही विषय चालतो; पण

समीक्षकाला मात्र साहित्य हाच ध्यास असतो आणि त्या ध्यासातूनच समीक्षक आस्थेने, जिज्ञासेने व प्रश्नांची उकल करण्याच्या अस्वस्थतेतून पुन्हा पुन्हा साहित्यकृतीकडे वळत असतात; असे प्रतिपादन केले आहे. हा मुद्दा स्पष्ट करताना, श्री०के० क्षीरसागर, दि०के० बेडेकर, कुसुमावती देशपांडे, वा०ल० कुलकर्णी ह्यांच्या वैचारिक भूमिका वेगवेगळ्या असल्या तरी त्यांनी आपल्या वैचारिक भूमिकेचे साधन म्हणून समीक्षालेखन केलेले नाही हे ते नमूद करतात. साहित्यकृतीला आपल्या समीक्षेने नवे नवे जन्म आणि मृत्यूही देणारा खरा 'सर्जनशील समीक्षक' असतो असे ते मानतात. अशा सर्जनशील समीक्षकांमध्ये दभिंचे स्थान अनन्यसाधारण आहे. त्यांनी केलेली मर्ढेकरांच्या कवितेची किंवा जीएंच्या कथांची समीक्षा वाचली तरी याचा प्रत्यय येतो. त्यांनी कविता, कथा, कादंबरी, नाटक अशा विविध साहित्याप्रकारांची चिकित्सा अभिजात रसिकतेने आणि मर्मग्राही दृष्टीने केलेली आढळते. 'अर्वाचीन मराठी वाङ्मय व अर्वाचीन मराठी वाङ्मयीन अभिरुची ह्यांच्याबाबतची माझी व्याकुळता आणि माझे असमाधान व्यक्त करणारा हा ग्रंथ' असे ते जेव्हा आपल्या 'दुसरी परंपरा' (१९७४) ह्या ग्रंथाच्या शेवटी 'ग्रंथकाराचे निवेदन' देताना म्हणतात, तेव्हा त्याचा संदर्भ त्यांच्यातल्या सर्जक आणि अस्वस्थ समीक्षकाशी असतो.

'पहिली परंपरा' ह्या पुस्तकातील काही लेखांमधूनही रसास्वादाकडून सिद्धांतनाकडे होणारा दभिंचा प्रवास दृष्टोत्पत्तीस येतो. केशवसुत, बालकवी, गोविंदाग्रज आणि मुक्तिबोध यांच्या काव्यामागील प्रेरणांचा शोध स्वायत्तपणे घेताना, ते आस्वादाच्या पलीकडे जाऊन त्यांच्या काव्यात आढळणारे कवीचे स्वातंत्र्य, कवीचा आत्माविष्कार, कवीची क्लृप्ती व कवीचे उत्तरदायित्व ह्या चार घटकांचा शोध घेतात. त्याही पलीकडे जाऊन त्या घटकांमागे असलेल्या गृहीतकृत्यांची मांडणी ते करतात. समीक्षा ही त्यांना आस्वादाची परिपूर्ती वाटते. अशी समीक्षा करण्यासाठी लागणारे प्रातिभ आकलन दभिंपाशी होते. समीक्षा करताना दभि स्वतःची परिभाषाही निर्माण करत जातात. उदा० प्रतीतिभेद, प्रतीतिविश्रांती, अर्थझंकार, अर्थव्यूह हे खास त्यांचेच शब्द!

एखाद्या कवितेची समीक्षा करताना तिच्या दर्शनी अर्थातून निघणारे 'अर्थझंकार' आणि त्यांतून निघणारे 'झंकारव्यूह' ह्यांचा प्रत्यय ते रसिकाला करून देत असतात. परंतु, त्यांची ज्ञानाधारित समीक्षादृष्टी त्यांना ह्या व्यूहभाषेच्या तात्त्विक विवेचनाकडे घेऊन जाते. 'भाषा आणि जीवन'च्याच पावसाळा २००७ अंकात त्यांनी व्यूहभाषेसंबंधी चर्चा केली आहे. ह्या लेखात त्यांनी अर्थव्यूह ही संकल्पना स्पष्ट करून पुढे म्हटले आहे, 'हे व्यूह स्वतः अर्थाचे बनलेले असतात आणि आपण ग्रहण केले की ते स्वतःतील अर्थ तर स्पष्ट करतातच; वर सौंदर्य, विस्मय, अनुभवसमृद्धी, आनंद ह्यांचीही निर्मिती ते आपल्या मनात करतात.' (पृ० ११) उत्तम साहित्यकृतीच्या





अनुक्रमणिका

वाचनातून आनंदाची रसपूर्ण अनुभूती प्रत्ययास येते हे खरे असले तरी ग्रहण करण्याचे काम वाचकाचे आहे हे दभि स्पष्ट करतात. इथे त्यांना रसिकाची भाषिक संवेदनशीलता आणि प्रगल्भ जाणीव अभिप्रेत आहे. ती जोपासण्याचे, अर्थात वाचकाच्या वाङ्मयीन अभिरुचीचा परिपोष करण्याचे कार्य दभिंच्या समीक्षेतून साधले जात असते हेही नमूद करणे आवश्यक आहे.

दभिंनी वेळोवेळी केलेल्या लेखनातून आपली भाषाविषयक भूमिकाही स्पष्ट केली आहे. 'प्रतीतिभेद' ह्या पुस्तकामधील 'मराठीचे भवितव्य' ह्या लेखात, 'मराठीचे भवितव्य अंधकारमय नाही' असे ते स्पष्टपणे नमूद करतात. मराठी भाषा आणि साहित्य जगवण्यासाठी मातृभाषेतून शिक्षण, मराठी परिभाषानिर्मिती, देवनागरी संगणक इत्यादी उपाय त्यांना मान्य आहेतच. त्याव्यतिरिक्त, मराठी अस्मितेचा अभिमान प्रत्येक मराठी माणसाच्या रोमारोमात भिनला पाहिजे असे ते म्हणतात. 'नव्या विश्वसंस्कृतीच्या भरणपोषणासाठी, तिच्या उन्नयनासाठीही देशी भाषा-संस्कृतीचे अस्तित्व अत्यावश्यकच आहे. म्हणजे ही नवी विश्वसंस्कृती एकारलेली आणि केवळ पाश्चात्त्यांची राहणार नाही' अशा प्रकारचे मार्मिक विधान ते करतात तेव्हा त्यांची परिघापलीकडचा विचार करण्याची क्षमता दिसून येते.

दभिंनी केलेली समीक्षा मूलगामी आणि अनेकांगी आहे. बऱ्याचदा ती प्रस्थापित विचारांना धक्के देणारी आहे. भारतीय साहित्यविचार जागता ठेवत, त्यांनी ज्ञानमार्गाचा अवलंब करत स्वत:च्या समीक्षेला वेगळ्या उंचीवर नेले. मर्ढेकरांच्या सौंदर्यशास्त्रविषयक भूमिकेची त्यांनी पुनःस्थापना केली. 'कादंबरी, महाकाव्य आणि शोकनाट्य यांचे अनेक धर्म आत्मसात करूनही आपले कथापण' कायम ठेवणारी जीएंची कथा त्यांनी अभ्यासली. त्यांची अभिजात रसिकता आणि व्यासंग ह्यांचा प्रत्यय त्यांच्या 'ज्ञानेश्वरांचे श्रोतृसंवाद' (१९७५) ह्या ग्रंथातूनही दिसून येत असल्याचे अभ्यासकांनी नोंदवले आहे. दभिंच्या या सर्व योगदानाचा सविस्तर परामर्श येथे घेणे शक्य नाही. त्यांनी मांडलेल्या मतांचे, सिद्धान्तांचे मूल्यमापन, खंडन-मंडन करून, त्यांना तार्किकतेच्या कसोट्या लावून मराठी समीक्षाविचार अधिक परिपक्वतेकडे नेण्याचे कार्य खरे तर तज्ज्ञ समीक्षकांचेच आहे. तसे घडले तर ती त्यांना खरी श्रद्धांजली ठरेल.

■





अनुक्रमणिका

# भाषाशुद्धी

दिवाकर मोहनी

महाराष्ट्र राज्याचे मराठीभाषाविषयक धोरण, पुढील पंचवीस वर्षांसाठी कसे असावे हे ठरवण्यासाठी शासनाने कोत्तापल्ले समितीची स्थापना केली. ह्या समितीने आपल्या शिफारसींचा मसुदा प्रस्तुत केला आणि त्यावर महाराष्ट्राच्या नागरिकांच्या सूचना मागविल्याचा. ह्या घटनेमुळे मराठी भाषेच्या सध्याच्या आणि २५ वर्षांनंतरच्या स्वरूपाविषयी चर्चा सुरू झाली आहे.

मराठीला ग्रंथनिविष्ट करताना जे नियम त्या लेखनाला लावावे लागतात त्यांना सुरुवातीला शुद्धलेखनाचे नियम म्हणत; नंतर त्यांना प्रमाणभाषेचे नियम म्हणावयास सुरुवात झाली. ह्यापुढे मात्र त्या लेखननियमांना मराठीच्या ग्रांथिक भाषेचे लेखननियम म्हणावे अशी माझी सूचना आहे. ही सूचना करण्याचे कारण असे की, बोलीभाषा आणि प्रमाणभाषा ह्यांच्या नात्याविषयी आज मराठी भाषकांमध्ये स्पष्टता नाही. ही अस्पष्टता असण्याचे कारण असे की, आम्ही जसे बोलतो तसेच लिहिले गेले पाहिजे असा सार्वत्रिक समज आहे. आणि प्रमाणभाषा ही तर फार थोड्या लोकांच्या घरात बोलली जाणारी बोलीभाषा आहे. ती महाराष्ट्रातील लोकसंख्येच्या केवळ साडेतीन टक्क्यांची भाषा आहे असे समजले जाते आणि साडेतीन टक्क्यांची भाषा उरलेल्या साडेशहाण्णव टक्क्यांवर का लादली जावी असा प्रश्न साहजिकच सर्वांच्या मनात उद्भवतो.

कोणतीही भाषा पूर्वी कशी बोलली जात होती, त्याचप्रमाणे कोणत्या प्रदेशात ती कशी बोलली जात होती, हे समजून घेण्यासाठी जुने लेख उपयोगी पडतात. सर्वांत जुने लेख शिळांवर, त्यानंतरचे काही ताम्रपटांवर आणि त्यानंतरचे भूर्जपत्रे, ताडपत्रे आणि कागद ह्यांवर लिहिलेले मिळतात.

आपण भाषण किंवा लेखन करतो हे एकमेकांना काही सांगावे त्यासाठी करतो. त्यामुळे सगळे लेखन व भाषा दुसऱ्याला समजेल असेच केलेले आढळते. जुन्या राजांच्या दरबारी अखबारनवीस आणि फार्सीनवीस (पारसनीस) असत. त्यांचे कार्य अखबार म्हणजे खबर लिहून ठेवणे आणि फार्सीनवीसाचे कार्य आपल्या राजाचे म्हणणे सम्राटाकडे लिहून पाठवणे हे होते. त्यामुळे बोललेली भाषा कधीच लिहिली गेली नाही. बोलण्याची व लिहिण्याची भाषा ह्या सतत वेगवेगळ्या राहत आल्या आहेत.

`भाषेविषयी दुसरा मुद्दा असा की, लिहिलेले शब्द ज्याला ती लिपी अवगत आहे, जो साक्षर आहे त्यालाच समजतात आणि ती भाषा जर त्याला परिचित असेल तर तो





अनुक्रमणिका

त्याचे उच्चार मनात करतो. तो स्वत: तसे उच्चार करू शकेलच असे नाही. त्याचे उच्चार त्याच्या मुखाच्या रचनेवर आणि बोलण्याच्या पूर्वीच्या सवयींवर अवलंबून असतात. अगदी जवळचेच उदाहरण द्यायचे तर ते बंगाली भाषेचे. बंगाली भाषेत 'व' आणि दंत्य 'स' त्याचप्रमाणे मूर्धन्य 'ष' ह्यांचे उच्चार नाहीत. 'व'चा उच्चार ते 'ब' असा करतात आणि श, ष, स ह्यांचा उच्चार तालव्य 'श' असा करतात. परिणाम असा होतो की इंग्रजीत स्पेलिंग करताना ते 'Shobha'ऐवजी 'Sova' बंगालीत लिहितात आणि 'Sova' चा उच्चार 'शोभा' असा करतात. लिहिताना चुकूनसुद्धा ते सोव्हा असे लिहीत नाहीत.

संस्कृतमध्ये व्याकरणाची महती सांगणारा एक श्लोक आहे –

यद्यपि बहुनाधीषे पठ पुत्र तथापि व्याकरणम्
स्वजन: श्वजनो मा भूत् सकलं शकलं सकृत् शकृत्।

ह्याचा अर्थ काय? - मुला, तू फार काही शिकला नाहीस तरी व्याकरण मात्र शीक. (तसे न केल्यास, उच्चाराप्रमाणे लिहिल्यास) 'स्वजन' 'श्वजन' (कुत्रे) होतील, 'सकल' 'शकल' होतील आणि 'सकृत' 'शकृत्' (शेण, विष्ठा) होईल.

बंगालमधील नवग्राम येथील एक चुणचुणीत मुलगा व्रतबंधानंतर गुरूकडे काशीला शिकायला गेला. तेव्हा त्याला लिपीचा परिचय झालेला होता. त्याला गुरूने 'तुला काय काय येते' असे विचारले. 'मला लिहिता येतं' असे म्हणून जेव्हा त्याने 'स'च्या जागी 'श' लिहिला तेव्हा गुरूने त्याला हा श्लोक ऐकवला असला पाहिजे. मुद्दा एवढाच की आपल्या उच्चाराप्रमाणे लेखन करावयाचे नसते. ते वाचणाऱ्याला समजेल असेच करावयाचे असते.

**आतापर्यंत आपण दोन मुद्दे मांडले -** (१) लिहिण्याची आणि बोलण्याची भाषा वेगळी असते आणि (२) उच्चाराप्रमाणे लेखन करावयाचे नसते. यापुढे बोलीभाषा आणि लिहिण्याची भाषा म्हणजेच ग्रांथिकभाषा ह्यांचे नाते समजून घेऊ. ग्रांथिकभाषेत कोणत्याही भाषेतले किंवा बोलीतले शब्द घेता येतात तर ती अशाच साऱ्या शब्दांनी बनलेली असते. जर कोणत्याही भाषेतले शब्द कोणत्याही दुसऱ्या भाषेत जाऊ शकतात तर मग भाषांचा वेगळेपणा कशात आहे? तो शब्दांत नसतो तर तो व्याकरणात असतो. आधुनिक हिंदी, आधुनिक मराठी आणि बंगाली ह्या भाषांमध्ये ७०-७५ टक्के शब्द संस्कृतातून आलेले आहेत. पण म्हणून त्या भाषा संस्कृत होत नाहीत. त्या त्या भाषांतील शब्दांना होणारे विकार वेगळे असल्याने त्या वेगळ्या नावांनी ओळखल्या जातात. येथेच आणखी एक गोष्ट सांगून टाकतो; ती अशी की, ह्याच भाषांची जननी संस्कृत आहे हा समज साफ चुकीचा आहे. ह्या भाषांची शब्दसंपत्ती मूलत: फार थोडी

आहे. ती शेतातल्या, स्वयंपाकघरातल्या आणि बलुतेदारांच्या कामापुरत्या शब्दांची बनलेली होती. मूळ मराठीमध्ये तर सुख-दुःख ह्यासाठीसुद्धा शब्द नाहीत. ते आम्ही संस्कृतमधून घेतले आहेत. भाववाचक नामे मूळ बीजभाषांमध्ये क्वचितच आढळतात. सुख आणि दुःख हे शब्द कसे घडवले हेसुद्धा पाहण्यासारखे आहे. 'सु' म्हणजे चांगले आणि 'ख' म्हणजे आकाश; तर 'दुः' म्हणजे वाईट आणि 'ख' म्हणजे आकाश. अनुकूल-प्रतिकूल हीही जोडी काय सांगते, हे येथे समजून घेऊ. 'कूल' म्हणजे नदीचा किनारा. अनुकूल म्हणजे नदीचा आपल्याकडचा किनारा व प्रतिकूल म्हणजे पलीकडचा किनारा.

तर बोलीभाषा ह्या निरक्षरांच्या भाषा होत्या. आणि त्यांमध्ये टिकाऊ विचार मांडायचा झाल्यास त्यांना तत्कालीन प्रमाणभाषेकडेच जावे लागायचे. बोलीचे प्रमाणीकरण करणे म्हणजे तिच्यातल्या नामांना लिंग-वचन-विभक्ती आदि आणि क्रियापदांना काल, पुरुष इत्यादींचे विकार कसे होतील ते ठरविणे. त्याचप्रमाणे त्या शब्दांना कोशनिविष्ट करणे. बोलीभाषेत हे सारे नियम अत्यंत शिथिल असतात तर प्रमाणभाषेत ते कठोर होतात. आणि प्रमाणभाषा ही कृत्रिमपणे मुद्दाम घडविलेली भाषा असते. ती तशी असल्यामुळेच ती कोणत्याही काळात आणि कोणत्याही प्रदेशात एकच अर्थ व्यक्त करते. ती देशकालातीत होते. ती भूतकाळापासून एका पद्धतीने चालत आलेली असते आणि ती तिची चाल बघून तिचे व्याकरण लिहिले जाते. बोलीभाषेचे व्याकरण लिहिणे अवघड काम आहे. कारण ती दर दहा-पंधरा कोसांवर बदलते. इतकेच नव्हे तर ती महाराष्ट्रात जाती आणि उपजातींबरोबरही बदलते. एकाच गावात राहणारी वारली, धोडी, कातकरी घरात आपसात वेगळी भाषा बोलतात आणि एकमेकांशी बोलायचे झाले आणि ते आपापल्या भाषेत बोलले तरी ती इतरांना समजते. काही भाषा एका जातीचे लोक आपसात व्यवहार करण्यासाठी वापरतात आणि बाहेर वेगळी भाषा वापरतात. नागपुरातले विणकर आमच्याशी हिंदी-मराठीत बोलतात व आपसात हळबी भाषेत बोलतात, जी आम्हांला अजिबात समजत नाही.

तोंडातून काढलेल्या शब्दांना किंवा पाटीवर लिहिलेल्या अक्षरांना स्वतःचा कुठलाही अर्थ नसतो. विशिष्ट संदर्भात तो उच्चार पुन्हा पुन्हा केल्याने त्याला अर्थ प्राप्त होतो. त्याचप्रमाणे लिहिलेल्या अक्षराकृतीला स्वतःचा काही अर्थ नसतो. ती आकृती पुन्हा पुन्हा विशिष्ट संदर्भासहित वापरली गेल्यास तिला अर्थ प्राप्त होतो. ह्याचा अर्थ असा की उच्चारात सातत्य राखावे लागते; त्याचप्रमाणे लेखनातदेखील ते राखणे आवश्यक असते; आणि अर्थ समजण्यासाठी त्या उच्चारांचा तसेच अक्षराकृतींचा पूर्वपरिचय असावा लागतो. अपरिचित भाषा जशी आपल्याला समजत नाही त्याचप्रमाणे अपरिचित

लिपीपासूनही आपल्याला कसलाच बोध होत नाही; म्हणून ते सातत्य टिकवणे अत्यावश्यक आहे. हे सातत्य ऱ्हस्व-दीर्घ उच्चारणात जसे टिकवायचे तसेच लेखनातही टिकवावे लागते. भाषेमध्ये पुष्कळदा एकाच उच्चाराचे पण भिन्न अर्थ दाखवणारे शब्द असतात. तेव्हा त्यांतला अर्थभेद संदर्भावरून समजून घ्यावा लागतो. ऐकताना पूर्ण वाक्य ऐकल्याशिवाय अर्थ स्पष्ट होत नाही. स्पेलिंगमुळे त्या शब्द कृतीला निश्चितार्थ प्राप्त होतो आणि वाचताना त्या स्पेलिंगचा फायदा असा होतो की पूर्ण वाक्य वाचावे लागत नाही. मधले काही शब्द गाळले तरी शब्दे न् शब्द वाचण्याची गरज सहत नाही. परिणामी वाचन शीघ्र होते. कारण संदर्भ लक्षात ठेवण्यात मेंदूला शीण येतो तो टळतो. मराठीमध्ये अर्थभेद दाखवण्यासाठी ऱ्हस्व-दीर्घ स्वरांसोबत अनुच्चारित अनुस्वारांचा वापर करण्याचा प्रघात आहे. गेल्या अंदाजे ६० वर्षांपासून अनुच्चारित अनुस्वारांचा वापर निषिद्ध मानला आहे आणि ऱ्हस्व-दीर्घ स्वरसुद्धा लेखनात ठेवू नयेत असा विचार आग्रहाने मांडला जात आहे. असे करणे इष्ट नाही, असे माझे मत असण्याचे कारण की, तसे केल्यास आपल्याला संदर्भावर फार जास्त अवलंबून राहावे लागेल. अशा लेखनात गंभीर, शास्त्रीय विषय लिहिणे आणि वाचणे अत्यंत अवघड जाईल. त्याचप्रमाणे ज्यांची मातृभाषा मराठी नाही अशांना (भाषा समजण्यासाठी लागणारे संदर्भ माहीत नसल्यामुळे) ती अत्यंत दुर्बोध व क्लिष्ट अशी होईल. थोडक्यात काय तर ती ज्ञानभाषा होणार नाही. त्याशिवाय कालपर्यंत छापलेले सर्व ग्रंथ अतिशय दुर्बोध होतील. जसे आज विदग्ध असे प्राचीन मराठी काव्य आपल्या कक्षेबाहेर गेले आहे.

अंदाजे गेल्या शंभर वर्षांपूर्वीपासून मराठी भाषेचे लेखननियम बदलण्याचे प्रयत्न झाले. मराठी भाषेचे व्याकरण गुंतागुंतीचे असल्यामुळे व त्या नियमांमध्ये अनुच्चारित अनुस्वारांची अडगळ मोठया प्रमाणात असल्यामुळे मराठीच्या सामान्य लेखकांना जे नियम पाळणे फार अवघड जाते ते सोपे केले पाहिजेत हा विचार प्रामुख्याने त्या काळातील मराठीच्या शिक्षकांपुढे होता. त्या प्रयत्नांना १९६२ साली यश येऊन सध्याचे लेखनाचे नियम अमलात आले आणि मराठीचे लेखन सुलभ झाले; पण अनुभव असा आला की हे सोपे केलेले नियमसुद्धा पाळले जात नाहीत. त्याचे कारण 'जे अवघड आहे' असे सांगण्यात आले ते 'लेखननियम आणखी सोपे करा', 'आम्हांला आमच्या उच्चाराप्रमाणे लिहू द्या' असा आग्रह बहुजनांकडून धरला जात आहे. बहुजनांचे उच्चार लेखनात आणले तर ते कोणत्या प्रदेशातले कोणत्या जातीचे हा प्रश्न उभा राहतो. आणि ते प्रश्न कधीच सुटू शकणार नाही; कारण बोली दर १०-१५ कोसांवर बदलते, हे आपणांस माहीत आहे.

## वाचन म्हणजे काय?

डोळ्यांच्या दिसणाऱ्या अक्षरांकृतीपासून, म्हणजे दृष्टिगम्य संकेतांपासून अर्थ ग्रहण करणे. प्राचीन काळी अक्षराकृतींपासून अर्थ ग्रहण केला जात नव्हता. कारण त्यावेळी मुद्रण नव्हते. जे डोळ्यांना दिसते त्याचा उच्चार करून श्रोत्यांना ऐकवण्यासाठीचे काम गावात ज्या व्यक्ती करीत त्यांना 'पाठक' किंवा 'कथावाचक' अथवा 'पुराणिक' असे म्हणत. त्यांचे कार्य लिहिलेले मोठ्याने वाचणे म्हणजे दृश्य संकेतांचे श्राव्य संकेतांत रूपांतरण करणे होते. 'वाचन' हा शब्दच वाचेमध्ये परिवर्तन असे सांगतो. आपण सध्या जे मनातल्या मनात वाचतो ते त्या काळात अशक्य होते. आज तसे करू गेल्यास आपल्याला एक वर्तमानपत्र वाचायला एक दिवस पुरणार नाही. आपण आज मजकुरावरून झरझर नजर फिरवून बरेच काही समजून घेतो. मनातदेखील उच्चार न करता आपण वाचू शकतो. जन्मापासून बहिरी असलेली मुले वाचन चांगल्या प्रकारे करू शकतात. हे कशामुळे शक्य होते ह्यांचा विचार करावा. आपले लेखन आपण अशा जन्मबधिर व्यक्तींसाठी करीत आहोत असे समजून त्या अक्षराकृतींमधील सातत्य टिकवले पाहिजे. कारण त्या आकृतींना अर्थ त्या सातत्यामुळेच येतो, हे आपण वर पाहिले आहे. कोणत्याही भाषेच्या लेखनाचे नियम वारंवार बदलणे चुकीचे आहे. अर्थात हे नियम तर्कशुद्ध आहेत असे येथे गृहीत धरले आहे. भाषा ही पूर्णतया तर्कशुद्ध कधीच नसते. हे जाणूनच मी हे विधान करतो आहे. जेथे तिचे लेखन नियमबाह्य होत असेल तेथे त्यांना अपवाद असे गणावे आणि ते अपवाद अत्यंत अल्प संख्येत ठेवण्याचा प्रयत्न करीत राहावा. ज्या अक्षराकृतींची डोळ्यांना सवय झाली आहे ती तशीच ठेवावी; कारण त्यामुळे आपल्याला एका कटाक्षात तो शब्द वाचता येतो.

लेखन उच्चारापासून मुक्त करण्याचे फायदे जसे जन्म-मूकबधिरांना होतात तसेच ते परभाषकांनाही होत असतात. एखादी लिपी शिकल्यानंतर वाचक एकच पुस्तक वाचणार नसतो. तो त्या लिहिलेली अथवा छापलेली सगळीच नवी-जुनी पुस्तके वाचणार असे धरून चालावे लागते. त्यामुळे लेखननियम निरनिराळ्या काळामध्ये निरनिराळे असून चालत नाही. माझ्या समजुतीप्रमाणे लेखननियम स्थिर होण्यासाठी मुद्रणविद्येचा पुष्कळ लाभ झाला असला पाहिजे.

लेखनाने उच्चार दाखवायचा नाही तर अर्थ व्यक्त करायचा हे एकदा ठरले की तो अर्थ व्यक्त करण्यासाठी प्रत्येक लिखित शब्दाने त्याचे मूळ कशात आहे हे दाखविण्याची गरज निर्माण होते. एकाच मुळापासून निर्माण झालेले अनेक शब्द असतात. मूळ व त्याला होणारे विकार एकदा कळले की त्याच मुळापासून झालेल्या

इतर शब्दांचा अर्थ आपोआप कळतो. त्यामुळे भाषा शिकताना व्याकरण शिकवण्याची गरज अधोरेखित होते.

ह्यापुढे मराठीच्या प्रमाणभाषेला ग्रांथिक भाषा म्हणावे असे मला वाटण्याची कारणे पुढे मांडतो :

प्रमाणभाषेला ग्रांथिक भाषा म्हटले तर सर्वांना ती लिहिता आलीच पाहिजे अशी गरज राहणार नाही. आज ज्यांना प्रमाणभाषा लिहिता-बोलता येत नाही, त्यांना; ज्यांना ती येते ते; तुच्छ मानतात. ह्या ठिकाणी हे लक्षात घेणे आवश्यक आहे की, सर्वांना म्हणजे १०० टक्के लोकांना प्रमाणभाषा लिहिता येणे अशक्य आहे. कोणत्याही समाजात अंदाजे ४ टक्के लोक मतिमंद किंवा गतिमंद असतात. त्यांना भाषाच काय, कोणत्याही विषयाचे आकलन पूर्णपणे होत नसते आणि ज्यांची बुद्धी सामान्य आहे असेच ९० टक्के असतात. अशा सामान्य बुद्धीच्या लोकांनासुद्धा कोणत्या तरी एकाच विषयात गती असू शकते. दोन-तीन भाषा ज्यांना चांगल्या समजतात अशांची संख्या तर फार अल्प हे जाणून इतरांना तुच्छ लेखू नये. ज्याप्रमाणे चित्रकार, मूर्तिकार, नर्तक, संगीतकार ह्यांची संख्या समाजात मर्यादित असते तशीच भाषेवर प्रभुत्व असणाऱ्यांची संख्याही अल्प असते. पण ज्यांना एखाद्या विषयात प्रावीण्य मिळविणे शक्य आहे अशी मुले हुडकायची कशी? तर हे विषय सर्वांना शिकवावे व त्यांच्या परीक्षा घ्याव्या म्हणजे कोणाला कोणत्या विषयात विशेष गती आहे हे कळेल. इतकेच नाही तर सर्वांना अशा विषयात इतरांनी मिळविलेल्या प्रावीण्याची जाण येते व समाजाचा सांस्कृतिक दर्जा उंचावतो.

कोणताही विषय शिकवण्यासाठी त्या विषयाची भाषा शिकावी लागते. पारिभाषिक शब्दांचा परिचय तर असावाच लागतो. पण भाषेची घडण जितकी अवगत असेल तितके त्या विषयाचे आकलन होणे सोपे असते. भाषा सर्व विषयांचा मूलाधार आहे; पण भाषेचे लेखन प्रत्येकालाच चांगल्या प्रकारे येईल असे मात्र नाही. म्हणून ज्यांना उच्चशिक्षण घ्यायचे आहे अशा विद्यार्थ्यांनाच केवळ अगोदर भाषेचे उच्च शिक्षण द्यावे. दहावीपर्यंत त्यांची जुजबी तयारी करावी व अकरावी-बारावीत त्यांच्याकडून पुढील उच्च शिक्षणासाठी आवश्यक असलेल्या भाषाकौशल्याची पायाभरणी करावी. सगळ्याच मुलांस सुरुवातीपासून दोन किंवा तीन भाषा शिकवण्यास माझा विरोध आहे. हे काम मुलांचा कल बघून अकरावी-बारावीत करावे. दहावीपर्यंत शिकलेल्यांना त्यांची मातृभाषा अनौपचारिकपणे वापरता येईलच. औपचारिक लेखन जर त्यांना करायचे असेल तर त्यासाठी ग्रांथिक भाषेचे शिक्षण त्यांना द्यावे लागेल. म्हणजे बोलण्यात आणि खाजगी लेखनात त्यांच्या झालेल्या व्याकरणाच्या चुकांकडे उदार बुद्धीने पाहावे.

ग्रांथिक भाषा सर्वांना यावी असे समजू नये. पण प्रमाणभाषा म्हटले की ती सर्वांना यावी असा विचार साहजिकच मनात येतो.

सगळ्या लेखकांना भाषा चांगली येते हा गैरसमज आहे. डॉ॰ वि॰भि॰ कोलते त्यांच्या 'मराठी दीपिका' ह्या पुस्तकात साहित्यसम्राट न॰चिं॰ केळकर, हरि नारायण आपटे, शि॰म॰ परांजपे, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, वामन मल्हार जोशी, आचार्य काका कालेलकर, वि॰दा॰ सावरकर, ज्ञानकोशकार केतकर, ना॰सी॰ फडके, ग॰त्र्यं॰ माडखोलकर ह्या सगळ्यांचे लेखनदोष उदाहरणासकट दिलेले आहेत. लेखनात सगळ्यांच्याच चुका होऊ शकतात हे जाणून कोणी कोणास हसू नये. आपल्या लेखनात दोष येऊ नयेत ह्याचा प्रयत्न सर्वांनी करावा आणि आपल्यापेक्षा ज्याला चांगले लिहिता येते त्याच्याकडून आपले लेखन तपासून घ्यावे. ग्रांथिक भाषा लिहिणे हे कठीण असते. शास्त्रीय संगीत गाणे जसे सगळ्यांना साधत नाही तसेच ग्रांथिक भाषा लिहिणेही सर्वांना साधत नाही. हे जाणून ती भाषा शिकावी व ज्यांना ती येत नाही त्यांना हिणवू नये.

सर्व बोलीभाषा आणि ग्रांथिक भाषा ह्यांची कार्यक्षेत्रे वेगवेगळी आहेत. बोलीभाषा ही ओळखीच्या लोकांशी संपर्क ठेवण्यासाठी वापरायची आहे. त्यामुळे ती मोकळेपणाने वापरण्याची आहे. अनोळखी लोकांशी संपर्क करताना मात्र ग्रांथिक भाषाच वापरली गेली पाहिजे. लग्नपत्रिका बोलीभाषेत छापावयाला काहीही हरकत नाही. कारण त्या 'पत्रिका' ओळखीच्या माणसांना द्यायच्या असतात. जर बोलीभाषेऐवजी थोडी औपचारिक भाषा वापरायची असेल तर त्यामध्ये सर्व शब्द प्रमाण असले पाहिजे याचा आग्रह नसावा.

बोलीभाषेमध्ये शब्दसंख्या कमी असते. ग्रांथिक भाषा वापरलीच नाही आणि बोलीभाषाच वापरण्याचा आग्रह धरला तर निरनिराळ्या विषयांच्या आकलनालासुद्धा मर्यादा पडतात; विचारशक्तीची वाढच खुंटते. म्हणून ग्रांथिक भाषा प्रत्येकाला लिहिता आली नाही तरी ती प्रत्येकाला वाचून समजली पाहिजे. ज्यांना आपले विचार अपरिचित लोकांसमोर मांडायचे आहेत त्यांनी ग्रांथिक भाषा आत्मसात करणे गरजेचे आहे. मग ते व्याख्यान असो वा लेखन.

ग्रांथिक भाषेचे स्वरूप कसे असावे ह्याविषयी येथे एक-दोन मुद्दे मांडतो. त्या मुद्यांचा विस्तार करण्यासाठी वेगळा लेखच लिहावा लागेल.

- ग्रांथिक भाषा कोणालाही पुस्तकावरून शिकता आली पाहिजे. त्यासाठी तिचे व्याकरण आणि शब्दकोश सुबोध पद्धतीने उपलब्ध करून दिले पाहिजे.





अनुक्रमणिका

- ग्रांथिक भाषेतला प्रत्येक शब्द कोशात जसा लिहिलेला असेल तसाच छापावयास पाहिजे. म्हणजे संस्कृत शब्द असेल तर संस्कृतच्या पद्धतीने छापावा. इंग्रजी शब्द असेल तर तो इंग्रजी पद्धतीने छापावा. फारसी असेल तर तो फारसी पद्धतीनेच छापावा आणि जोडाक्षरे छापताना ती देखील ज्या नियमांनी बांधली आहेत ते नियम पाळून ती छापली गेली पाहिजे.

■

## 'भावरती'

या आत्मनिवेदनातील संवादांत जेव्हा क्वचित कोंकणी वा घाटी लोकभाषा येते, तेव्हा तर निवेदनाला वेगळीच टवटवी येते. रणजितांची प्रथम पत्नी सुनंदा हिच्या वेडाचा इतिहास माधवींना शेजारच्या खेडूत बाईकडून कळतो, तो प्रसंग चटका लावून जातो, तो त्या खेडूत बाईच्या ग्रामीण भाषेमुळे (२०१). त्यातील 'त्या वैनीसाबजी अशाच तिनीसांजचं बसायच्या. ... लई भावरती व्हत्या', ही वाक्ये वाचली आणि चाळीस वर्षांपूर्वी एकदा तोंड दाखवून, पण ओळख न देता, निसटलेला 'भावरती' हा शब्द परत भेटल्याचा आनंद झाला. तो भेटला होता परशुरामाच्या लावणीच्या 'पांडु म्हणजे हरिभक्त वांचले भोळे भावरती' या आभोगात. त्याचा नेमका अर्थ जाणून घेण्याकरिता कैक कोश धुंडाळले होते, पण भल्या भल्या कोशकारांच्या बारीक नजरेतूनही तो सटकला होता. तेव्हापासून आजवर प्राचीन व अर्वाचीन मराठी साहित्य काही थोडेथोडके वाचले नाही, पण याने काही परत तोंड दाखवले नव्हते. प्रस्तुत स्थळी तो परत भेटला, तेव्हा लगेच लेखिकेला पत्र पाठवून त्याचा नेमका अर्थ विचारला. त्यांनी 'भाबडी, भावूक' असा अर्थ कळवला, दोन्ही ठिकाणी तो चपखल बसला, आणि त्या शब्दाने गेली चाळीस वर्षे मांडलेला छळवाद संपला! दोनशे वर्षांपूर्वी गंगाथडीच्या परशुरामाने वापरलेला शब्द बेळगावकडे आजही प्रचारात असावा, एवढे एकच कारण बेळगावचा महाराष्ट्रात समावेश करण्यास पुरेसे आहे!

- म॰वा॰ धोंड

('जाळ्यातील चंद्र' मधील माधवी देसाईलिखित
'नाच ग घुमा' ह्या आत्मचरित्रवरील परीक्षणलेखातून)





अनुक्रमणिका

# समृद्ध मराठीसाठी

द०ता० भोसले

शिकार करून जगणाऱ्या आदिमानवाच्या आयुष्याला क्रांतिकारी वळण देणाऱ्या महत्त्वाच्या गोष्टी तीन : एक, ह्या मानवाने लावलेला अग्नीचा शोध. दोन, त्याने तयार केलेले चाक आणि तिसरी गोष्ट म्हणजे विकसित केलेली भाषा. ह्या तीन क्रांतिकारी गोष्टींमध्ये त्याने लावलेला आणि विकसित केलेला भाषेचा शोध अधिक महत्त्वाचा आहे. एक तर अग्नीला काळजीपूर्वक जपावे लागते. संरक्षित ठेवावे लागते. त्याच्याकडे जरासे दुर्लक्ष झाले तर आपले अन्न शिजवण्यास अग्नी आपली झोपडी केव्हा जाळून टाकील हे सांगता येत नाही. भाषेचे तसे नसते. तीच गोष्ट त्याने तयार केलेल्या चाकाची, जे तयार करण्यास कष्ट पडतात, वापरताना कष्ट पडतात, संरक्षणासाठी कष्ट पडतात. अन् वाहून नेतानाही कष्ट पडतात. शिवाय चाकाला लवकर मरण ठरलेले. भाषेला मरण नसते, म्हणजे चार दोन वर्षांत ती नष्ट होत नाही. शिवाय भाषा ही अनुभव कथन करते, अनुभव जतन करते, संवादासाठी वापरता येते, आत्मसंवादासाठीही तिचा वापर करता येतो. भुकेपासून भयापर्यंत आणि प्रेमापासून वैरापर्यंत साऱ्या भावना त्याद्वारे व्यक्त करता येतात. व्यक्त होण्यातील समाधान, ग्रहण करण्यातील आनंद,आदान-प्रदानातील सौख्य आणि आत्मिक अन् भौतिक प्रगतीतील धन्यता केवळ भाषावापरामुळे आपणांला प्राप्त होत असते. म्हणून माणसाच्या जगण्याचा बहिश्चर प्राण म्हणजे त्याची भाषा. श्वासाइतकेच तिला महत्त्व असते. श्वासाइतकीच तिची गरज असते.

ह्या गरजेपोटीच आदिमानवाने शब्द तयार केला. त्याचा वापर करताना त्याला अर्थ बहाल केला. शब्दापासून नंतर त्याने भाषा निर्माण केली. भाषेपासून मग साहित्य निर्माण झाले आणि साहित्यातून संस्कृती आकाराला आली, आणि संस्कृतीचं उबदार वस्त्र परिधान करून त्याने विलक्षण प्रगती साधली. म्हणजे या प्रगतीचे मुख्य कारण किंवा साधन झाले भाषा आणि तिला आकार देणारे शब्द. म्हणून जी भाषा शब्दसंग्रहाने समृद्ध असते. ज्या शब्दांना अनेक पर्यायी शब्द असतात, अर्थाच्या नानाविध छटा व्यक्त करणाऱ्या शब्दांची संख्या अधिक असते आणि ज्या भाषेत म्हणी, वाक्प्रचार, उखाणे, सुभाषिते अधिक असतात, ती भाषा समृद्ध आणि श्रीमंत मानली जाते. ती भाषा व्यवहारामध्ये वापरताना कमी पडत नाही असा सार्वत्रिक अनुभव आहे.

कोणतीही भाषा स्वभावतः परिवर्तनशील असते. तिच्यामध्ये सातत्याने बदल होत असतात. हे बदल प्रामुख्याने भौगोलिक प्रदेशामुळे होतात. बदलत्या कालमानानुसार होतात. तात्कालिक व अभिरुची आणि भाषा वापराच्या मनोवृत्तीतून होतात. दोन





अनुक्रमणिका

संस्कृतींच्या सहवास आणि आदान-प्रदानातून होतात. राजकीय सत्ताधीशांच्या भाषाभिमानातून होतात आणि समाजाच्या साक्षर-निरक्षर-नागर-ग्रामीण वर्गीय आणि श्रेष्ठ-कनिष्ठता आणि ज्यांच्या हातात परंपरेने लेखणी आलेली आहे अशा मंडळींच्या लेखनातून होतात. त्यातूनच व्यवसाय आणि परिसर ह्यांमुळे भाषेचे नाना गट तयार होतात. त्यातूनच बोलींचा जन्म होत असतो. त्यामुळे एखाद्या राज्यात अशा अनेक बोली तितक्याच सक्षमपणे समपातळीवर आणि सन्मानाने वापरल्या जातात. मात्र कालांतराने समपातळीवर असलेल्या ह्या भाषा ज्यांच्या हातात लेखणी असते, त्यांच्याकडून प्रमाणभाषेत रूपांतरित होतात. त्या भाषेला प्रतिष्ठा प्राप्त होते. मग सर्व समाजाची तीच एक भाषा मानून व्यवहार केले जातात आणि आपोआपच अभिव्यक्ती आणि शब्दसंपत्ती चांगली असूनही बोली भाषा मागे पडतात, त्या अव्हेरल्या जातात. एवढेच नव्हे तर सुशिक्षित नागर समाज ह्या बोली भाषा म्हणजे अडाणी, निरक्षर, गावंढळ, मागासलेल्या लोकांची भ्रष्ट भाषा म्हणून तिची उपेक्षा करतात. तिचा वापर करणे म्हणजे आपल्या शुद्ध भाषेला भ्रष्ट आणि विकृत रूप देण्यासारखे आहे, अशी धारणा बाळगून त्यांच्यापासून चार पावले दूर जातात. ह्या बोलीतील शब्दांचा व्यवहारात आणि लेखनात ते वापर करण्याऐवजी पद, प्रतिष्ठा व पैसा देणारी 'साहेबांची भाषा' मात्र मोठ्या अभिमानाने वापरतात. त्या वापरताना आपलीही सामाजिक प्रतिष्ठा उंचावते, अशी त्यांची धारणा असते.

त्यामुळे आज आपल्या मराठीमध्ये असलेल्या सुंदर, अर्थपूर्ण आणि 'लयवेल्हाळ' बोलींचा आणि त्यांतील रसरशीत शब्दांचा वापर खूप कमी आढळतो. एखादा तरुण बोलता बोलता 'मदर जरा सीरियस होती, सो तिला हॉस्पिटलमध्ये ॲडमिट करून ताबडतोब रिटर्न झालो' अशी भ्रष्ट भाषा सहजपणे वापरतो. पण त्याला आपल्या बालपणीच्या गावरान बोलीतील शब्द वापरावेसे वाटत नाही. अन् तसे कोणी धाडस केले तरी त्याची समाजात अवहेलना होते, टिंगलही होते. पण सक्षम भाषेसाठी अटळ व अपरिहार्य असे परकीय भाषेतील शब्द स्वीकारणे आवश्यक असते, हे खरे असले तरी आपण आपल्या बोलीतील शब्दांचाही जाणीवपूर्वक वापर केला पाहिजे. गेल्या वीस-पंचवीस वर्षांपासून विविध भागांतून आलेल्या लेखकांनी ह्या बोली शब्दांचा आपल्या लेखनात वापर केल्याने त्यांना थोडीफार प्रतिष्ठा व मान्यता मिळालेली आहे. पण एवढ्यावरच न थांबता मराठी ही ज्ञानभाषा होण्यासाठी, अर्थाच्या सूक्ष्म अर्थच्छटा व्यक्त करण्यासाठी अचूक अर्थाभिव्यक्तीसाठी अंगभूत गोडवा अन् त्या त्या भूमीचा गंध घेऊन आलेल्या ह्या बोलींतील शब्दांचा अधिकाधिक वापर होणे आवश्यक आहे. निबार, कसनुसं, हेंबाडं, गबाळ, धांदोटी, मानगूट, हुबलाक अशांसारखे शब्द वापरले

तर आपली भाषा आणि आपले साहित्य खरोखर सशक्त, श्रीमंत, समृद्ध झाल्याशिवाय राहणार नाही असे वाटते.

मराठीवर मनापासून प्रेम करणाऱ्या प्रत्येकाने ही भूमिका मराठीला थोरपणा प्राप्त करून देण्याकरिता घ्यावी असे मला वाटते.



## अहिराणी बोलण्यास मनाई!

सटानानी पंचायत समितीना शिक्षन विभागमा येक सुचना लायेल व्हती, 'इथे अहिराणी बोलण्यास मनाई आहे. बोलल्यास सक्त कारवाई करण्यात येईल.' हायी सूचना वाचीसन 'अहिराणी नाद'तर्फे शिक्षन अधिकारी यास्ले आम्ही पत्र लिह्य. भारतीय संविधानना आठवा परिशिष्टमा परत्येकले आपली बोली बोलानं स्वातंत्र्य शे. भाष शास्त्रना मते कोनतीच भाषा अशुध नही. आपली भाषामा शिक्षन दिधं त्ये विद्यार्थी ज्ञान लवकर ग्रहन करतंस, म्हनीसन अहिराणी भागमा त्या भाषाना शिक्षक नेमीसन स्थानिक भाषामा शिक्षन देवा, आशे शिक्षनतज्ञस्ना सल्ला घीसन सरकार इचार करी ऱ्हायनं. मात्र सटनामा शिक्षन विभागमा आशी सुचना लावनं म्हंजे नुस्ती अहिराणीनाच नही त्ये सगळ्या भाषास्ना तो अपमान शे.

ह्या पत्रनं उत्तर आजूनबी वनं नही. पन ती सुचना आता काढाई गयी. काही लोक कोनं सांगेलबी आयकतं नहीथ. आपला आडानीपनवर त्यास्ना ठाम इस्वास ऱ्हास. आशा जागे आपुले हात टेकी देना पडतंस. आशा काही आज्ञानपनखाल आपू भाशाले दिवसेंदिवस मारी ऱ्हायनूत.

- डॉ॰ सुधीर रा॰ देवरे

('अहिराणी वट्टा'मधील 'म्हनी मायबोली - अहिराणी' ह्या लेखातून)

# स्पर्धा परीक्षेतील मराठी भाषा : वास्तव आणि अपेक्षा

दत्तात्रय घोलप

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने राज्य सेवा (मुख्य) परीक्षेमध्ये मराठी व इंग्रजी ह्या विषयाच्या प्रश्नपत्रिकेचे स्वरूप वस्तुनिष्ठ बहुपर्यायी असे बदलण्याचे ठरविले आहे. हा बदल कशा पद्धतीने होणार ह्याची घोषणा आयोगाने २० जून २०१५ रोजी संकेतस्थळावर प्रसिद्ध केली आहे. ह्या बदलाचे स्वरूप लक्षात घेता मराठी विषयाच्या संदर्भाने विचार करणे आवश्यक ठरते.

वस्तुनिष्ठ बहुपर्यायी परीक्षापद्धतीतून आयोगाचा 'उमेदवाराचे भाषिक ज्ञान, अभिव्यक्ती, आकलनक्षमता, लेखन आणि संवाद कौशल्याच्या जाणिवांचा स्तर पडताळणे' हा उद्देश ह्यातून कसा काय साध्य होणार हा मूलभूत प्रश्न आहे. चार पर्यायांपैकी एक निवडून पात्र होणाऱ्या उमेदवाराचे योग्य त्या भाषिक उपयोजनातून तर्कसुसंगत अभिव्यक्ती करण्याचे कौशल्य कसे तपासणार? तो आधीच्या परीक्षापद्धतीत काही मर्यादेपर्यंत होत होता. ह्यात गंभीर बाब अशी आहे की पेपर तपासायला तज्ज्ञ मिळत नाहीत हे आयोगाचे कारण (दै० लोकसत्ता, १८ जून २०१५) न पटण्यासारखे आहे.

भाषा विषयाचा विचार करताना येथे भाषातज्ज्ञ किंवा समीक्षक निवडायचे नसून शासन-व्यवहारात येणाऱ्या प्रत्येकाला जनसामान्यांशी संवाद साधण्याचं प्रभावी माध्यम व्यवस्थित माहीत असावे हाच दृष्टिकोण अभिप्रेत आहे. कोणत्याही भाषेच्या अभ्यासात त्या भाषेचे बोलीरूप महत्त्वाचे असते. व्यवहारभाषेचा अभ्यास महत्त्वाचा असतो. भाषा ही गोष्टच मुळात प्रवाही असते. नित्यनूतन बदलणारी असते. ह्या बदलाचे प्रतिबिंब आयोगाच्या भाषाभ्यासात दिसत नाही. भाषेचा अभ्यास वेगवेगळ्या पातळ्यांवरून होत असताना, आयोग मात्र 'पारंपरिक मराठी व्याकरण' ह्यालाच जोडून राहिला आहे. भाषेचं समाजशास्त्र तो समजून घेणार आहे की नाही? भाषेचे प्रादेशिक भेद, तिचे सामाजिक स्तरीकरण ह्यांमध्ये प्रादेशिक बोली भाषांचा किमान परिचय होईल, त्या भाषेचा वेगळेपणा लक्षात येईल एवढा तरी समावेश अभ्यासक्रमात असावा. ह्या गोष्टी आल्या तर ह्यातून तयार होणारा अधिकारी कुठल्याही प्रांतांत गेला तर त्याला अडचण येणार नाही. कारण भाषेचं 'समाजशास्त्र' त्याला माहीत असेल. भाषा ही फक्त भाषा असत नाही, तर तो तुमचा जगाकडे पाहण्याचा दृष्टिकोणही असतो. सध्याच्या पद्धतीत समाजापासून फटकून असणारी ग्रांथिक मराठी अभ्यासून 'फाईल पाठविली' असे न





अनुक्रमणिका

म्हणता, 'निर्गमित' केली असे म्हणणारे अधिकारी तयार होतात! हे समाजाचे नुकसान करणारे आहे.

एकतर मराठीच्या संदर्भाने स्पर्धा परीक्षेच्या विश्वात (ग्रंथ आणि क्लासेस) जे चालू आहे. ते फार उथळ आणि उबग आणणारे आहे. आज बाजारात ग्रंथ उपलब्ध आहेत ते एकतर संकलित केलेले आहेत. पुण्यातील नामवंत ॲकेडमींनी ह्याच पद्धतीचे व्याकरणासंबंधीचे ग्रंथ प्रकाशित केले आहेत. दुसऱ्या प्रकारचे ग्रंथ म्हणजे मो॰रा॰ वाळंबे ह्यांच्या ग्रंथावर आधारलेल्या सुधारित नोट्स. ह्या नोट्समध्ये सामाजिक शास्त्रांची पद्धत वापरून मुद्देसूद मांडणीच्या नावाखाली भाषाभ्यासाची गणिती, तांत्रिक आणि कृत्रिम मांडणी केलेली दिसेल. जिवंत भाषेचे व्यावहारिक स्वरूपच अभ्यासले जात नाही. अलीकडच्या काळात शब्द उपयोजनात नेमक्या ह्या बाबी विचारतात. गेल्या काही परीक्षांत 'शब्द' हा घटक केंद्र करून वस्तुनिष्ठ प्रश्नपत्रिकेत अधिक प्रश्न विचारले आहेत. ह्यातून शब्द उपयोजनातले वेगवेगळे संदर्भ माहीत असल्याशिवाय योग्य उत्तरापर्यंत पोहचता येत नाही. 'अपरोक्ष' हा शब्द 'डोळ्यांदेखत' ह्या अर्थाने असताना तो नेहमी विद्यार्थी उलट्या अर्थाने वापरतात. कारण त्यांनी तो फक्त विरुद्धार्थी ह्या सदरातच पाहिलेला शब्द असतो. त्यामुळे त्याचा नेमका अर्थ माहित नसतो. ह्याचबरोबर कोणत्याही विषयाचे वाचन करताना शब्द काय सांगतो हे आपण पाहतो. परंतु तो शब्द कसा लिहिला आहे हे पाहत नाही. त्यामुळे शुद्धलेखन ही सवय होत नाही, ह्याचाही फटका परीक्षेत बसतो.

निबंध लेखनासंबंधी तर एवढे गैरसमज ह्या बाजारू पुस्तकांनी पसरवलेले आहेत, की विचारू नका! आपण स्पर्धा परीक्षेसंबंधीचे कोणतेही पुस्तक घ्या. आपल्याला तात्काळ ह्याची प्रचीती येईल. मराठीचा अभिव्यक्ती-व्यवहारच नियंत्रित करण्याचा हा प्रकार वाटतो. निबंधात सहजतेने तर्कसुसंगत मतप्रदर्शन आवश्यक असते. ह्याचे विवेचन न होता म्हणी, वाक्प्रचार, अवतरणे, संतवचने, सुभाषिते ह्यांचा आग्रह धरलेला असतो. हे वाचून तयार होणाऱ्या परीक्षार्थ्याला वाटते दहा ओळी झाल्या अजून, तरी अवतरण नाही म्हणजे काय? मुळात ह्या गोष्टी तुमच्या मतप्रतिपादनाला पुष्ट्यर्थ म्हणून असतात. संदर्भ तुमचे म्हणण्याचे ठाशीवपण अधोरेखित करतात. भाषेला नटवायचे नसते, सजवायचे तर अजिबात नसते. सहज बोलण्याच्या ओघात असते तशी अकृत्रिमता राहावी एवढीच अपेक्षा असते. जसे निबंधलेखनाचे आहे तसेच संघ लोकसेवा आयोगाच्या 'मराठी साहित्य' हा वैकल्पिक पेपर घेणारांना तर योग्य मार्गदर्शक आणि संदर्भ साधनांची वानवाच जाणवते. खरे तर संघ लोकसेवा आयोगाच्या अभ्यास साधनांत मराठी विषयाचे अनेक ग्रंथ हवेत. साहित्यव्यवहारातील नेमलेला कालखंड, साहित्यकृती, भाषाविज्ञान ह्यासंबंधाने ह्या स्पर्धात्मक परीक्षेच्या





अनुक्रमणिका

उपयोगासाठी संदर्भ साधने कमी आहेत. आहेत ती गाईडवजा. त्यांतून साहित्यकृतीच्या आशय आणि आविष्कारासंबंधीचे सुस्पष्ट आकलन होत नाही. साहित्याच्या संबंधाने काळाचे सामाजिक-सांस्कृतिक अनुबंध उलगडले जात नाहीत. असा गाईडवजा ग्रंथव्यवहार सध्या जोरात आहे.

मराठी भाषासंबंधाने स्पर्धा परीक्षा क्लासमध्ये जे शिकवले जाते ती भाषा ही आपण म्हणतो तशीच नियमबद्ध असते, अशा थाटात शिकवतात. व्याकरणाच्या क्लृप्त्या आणि सूत्रे ह्या पद्धतीने हे मार्गदर्शन वर्ग चालतात. ही सूत्रे नेहमीच उपयोगाला येत नाहीत. 'काटे' ह्या शब्दाचे लिंग ओळखा असा प्रश्न जिल्हा निवड मंडळाच्या परीक्षेत विचारला होता. विद्यार्थी गणिती सूत्र वापरून 'ते-काटे' नपुंसकलिंगी असेच उत्तर देत होते. पर्यायांत पहिला पर्याय नपुंसकलिंगीच होता. वचन बदलले तरी लिंग बदलत नाही. मूळ रूप 'काटा' हे पुल्लिंगी आहे एवढेही आकलन जमू नये हे दुर्दैव नव्हे? मराठीची वर्णव्यवस्था अभ्यासताना पाठांतरच घेतात. उच्चारस्थानानुसारचे वर्गीकरणही पाठच करतात. 'प्' उच्चारताना आपल्या मुखविवरात ओठांची हालचाल होते ते ओष्ठ्य व्यंजन आहे, हेही ते पाठच करतात. उच्चारून बघत नाहीत. क्लासेस मार्केटमध्ये एवढा गजबजाट असताना मराठी भाषेच्या अभ्यासाची ही अशी अवस्था आहे.

अभ्यासक्रम तयार करत असताना आयोगाने भाषेचा गाभा म्हणजे उच्चारव्यवस्था आणि सामाजिक घटकांनी नियत होणारी भाषेची अर्थव्यवस्था ह्याची मूलभूत चौकट ठरवून घ्यावी. व्यवहारभाषा जाणीवपूर्वक विचारात घेऊन तिचे विविध पैलू अभ्यासले जावेत अशी अपेक्षा आहे. त्यायोगे प्रत्यक्ष समाजव्यवहारात प्रशासनातील व्यक्तीला अडचणी येणार नाहीत. इतर विषयांचे अभ्यासक्रम काळानुरूप बदलत असताना मराठी भाषेच्या बाबतीत अजून वसाहतकालीन व्याकरणच अभ्यासले जात आहे. भाषा अभ्यासणे म्हणजे व्याकरण अभ्यासणे किंवा नेमलेल्या साहित्यकृती अभ्यासणे असा मोठाच गैरसमज झाला आहे. त्यामुळे स्पर्धा परीक्षेच्या अभ्यासक्रमात आणि परीक्षापद्धतीत आमूलाग्र बदलाची आवश्यकता आहे. व्याकरणाचे नियम पाठ करण्यापेक्षा भाषाभ्यासाची व्यूहनीती समजून घेऊन मराठी भाषेचा अभ्यास केला तर विशेष फायदा होईल.

■





अनुक्रमणिका

# सलील वाघांची काव्यभाषा आणि भाषाकाव्य

नीती बडवे

## प्रास्ताविक

सलील वाघांच्या काव्यातली भाषा आणि भाषेवरचं काव्य दोन्ही जरा 'हटके', रूढीबाह्य आहे. त्यांची काव्य आणि भाषेची संकल्पना आणि एकमेकांशी नातं गुंतवून ठेवणारं आहे. सद्यःस्थिती आणि सभोवताल निरखून अस्वस्थ झालेला कवीचा आत्मा सलील वाघांमध्ये दिसतो. जाणीव आणि अभिव्यक्तीमधला अव्याहत संघर्ष प्रत्ययाला येतो. त्यांची कविता – भाषेचं माध्यम म्हणून अफाट सामर्थ्य आणि भाषेच्या मर्यादा – दोन्हींची एकाच वेळी तितक्याच प्रकर्षानं जाणीव करून देते.

## विविध भाषा आणि बोली

अनेक वैज्ञानिक, पारिभाषिक शब्द, कोणत्याही विषयातली सूत्रं (शेवटी पाहा : कविता 'दोन'), सॉफ्ट वेअरमध्ये वापरायची चिन्हं, किंबहुना संगणकाच्या कळफलकावरची कोणतीही चिन्हं सलील वाघांच्या कवितेत कुठेही येऊ शकतात. सर्व चिन्हांचा बोध वाचकाला होईलच असं नाही, पण अभिव्यक्तीसाठी रोजच्या वापरातली भाषा कशी अपुरी पडते, हे वाचकाला नक्कीच पदोपदी जाणवतं (शेवटी पाहा : कविता 'भूर्जपत्र', पान ४५ आणि ४९). 'तगडक, ढाकचिक, ततड', असे नादानुसरी शब्द, इंग्रजी-हिंदी शब्दांची रेलचेल, इतकंच नाही, तर जर्मन, गुजराती, बंगली, कानडी अशा अनेक भाषांमधल्या शब्दांचा वापर, हे सलील वाघांच्या अभिव्यक्तीचे ढोबळपणे जाणवणारे विशेष झाले. पण त्याचबरोबर ते काही बोलींचाही वाखाणण्यासारखा उपयोग करतात. 'न्यारी न्यारी दीवानगी' हा छोटा कवितासंग्रह सगळाच बम्बैय्या हिंदीमधला आहे. एका ठरावीक स्तरातल्या, बाहेरून आलेल्या गरीब माणसांच्या तोंडची ही भाषा आहे. इतरत्रही गावाकडची भाषा, जत्रेतली भाषा, कंपनीमधल्या रखवालदाराची किंवा प्यूनची भाषा, ह्यांचा वापर केलेला दिसतो. त्याचप्रमाणे अभंग, भजन, ओवी, लावणी (!) अशा वेगवेगळ्या प्रकारांचा चपखल वापर केला आहे. लावणी असं शीर्षक असलेली दोन छोट्या ओळींची लावणी आहे : *'आवं राया / लॉगीन करताय न्हवं ...'*

'बिडॉयटेट' ह्या जर्मन आणि 'टूहमसोएव्हरइटमेकन्सर्न' ह्या इंग्रजी शीर्षकाच्या 'रेसकोर्स'मधल्या दोन कविता. दोन्हीमध्ये जवळपास एका आड एक ओळ मराठीत आहे. मराठी आणि जर्मन ओळींमध्ये, तसंच मराठी आणि इंग्रजी ओळींमध्ये दोन पूर्ण वेगळे विषय आणि संदर्भ आहेत. 'बिडॉयटेट' ह्या जर्मन कवितेत दोन ओळी

आहेत:'*कोथळ्याबाहेर / जंकफूड पूर्णब्रह्म*'. 'निष्ट श्प्रेशन' ह्या आणखी एका जर्मन शीर्षक असलेल्या कवितेत चार ओळी आहेत : '*नको माझ्या शब्दांना / संतवाक्याचा कुटाळ / ब्रह्मवाक्याचा विटाळ / (नोखाईनमान बिटं)*'. ही कंसातली ओळ जर्मनमध्ये आहे. ह्या कवितेच्या शेवटच्या ओळी आहेत : '*अष्टादश चक्क उसंत / रतिक्लांत अधम अधरओष्ट*'. 'रेसकोर्स'मधल्या 'उतरली तारकादळे ...' मध्ये '*वॉट्ट्पाक मध्ये / सकलसालन्कृत / सोफ्टवेअरसमृद्ध सवाद्य नवलाई* आहे. 'आधीच्या कविता' : 'चोपत्र'मध्ये काही असभ्य शब्द, हिंदी, संस्कृत, इंग्रजीमधले शब्द येतात. पितरं, मटका, फोरेनला असे विविध स्तरावरचे, विविध संदर्भ असलेले शब्द शेवटच्या तीन कडव्यात येतात. 'भूर्जपत्र' नावाच्या कवितेत 'मादडे बरेयबहुदु बल्लेबल्ले' म्हणजे कानडी आणि पंजाबी शब्दांची ओळ आहे. त्याखालीच अनेक भाषांतून बनवलेला एक शब्द येतो : '*स्टुपिडचूडामणीकांचौ*' ! अशी भाषेची आणि शैलीची तोडमोड बऱ्याच ठिकाणी केलेली दिसते.

## भाषेचं सादरीकरण

सलील वाघांना सरस्वती प्रसन्न असूनही 'भाषा' मध्यम म्हणून त्यांना अपुरी पडते हे सतत जाणवतं. कधी अगदी हमरीतुमरीवर येऊन भाषेशी हातापायी चाललेली दिसते. भाषेची तोडमोड, नवीन शब्दनिर्मिती, ओळींची आणि वाक्यांची तोडमोड, कधी मुद्दाम चुकीच्या उच्चारांप्रमाणे लिहिणं, अशा अनेक पर्यायांचा उपयोग केलेला दिसतो. जवळ जवळ सगळ्याच कवितांमध्ये भाषेला पूरक म्हणून शब्द आणि ओळींची वेगळी आणि वैचित्र्यपूर्ण मांडणी केलेली दिसते, ते सोबत दिलेल्या कवितांवरून पटकन लक्षात येईल. कधी दोन शब्दांची अनपेक्षित सांगड घातलेली दिसते. जसं 'चिरेबंदी धोके', 'उचलली जीभ लावली धक्क्याला' (बहुतेक संदर्भामुळे), 'चारी मुंड्या ग चंगळ', 'बदाबदा आबादीआबाद', 'स्वप्नं धाय मोकलून थिजतात', अशी कितीतरी उदाहरणं देता येतील. अशा रचनांमधून नक्कीच काही वेगळं व्यक्त होतं. धोक्यांना आलेलं मूर्त स्वरूप, धाय मोकलून थिजणारी स्वप्नं, 'बदाबदा आबादीआबाद'मध्ये शब्दाचं उच्चारणच बरंच काही सांगून जातं, निदान हे सकारात्मक वर्णन नाही एवढं तरी. तसंच 'चारी मुंड्या ग चंगळ' मधे अनुप्रासाची बाजू महत्त्वाचीच आहे. दोनदा मोठ्यांदी उच्चारल्यावर त्याचा अर्थ म्हणजे प्रयोजन काय ते नक्कीच लक्षात येईल. कधी कधी विरुद्ध अर्थाचे शब्द एकत्र येतात, जसं : '*मुक्तीच्या लोभात गुरफटलो*', '*अधांतरी लामणदिवे / चिंब*', '*अमावस्येचा/ आक्रमत / चंद्र / छाळणारा*' किंवा '*गोऱ्या चांदण्यांच्या ज्वाळेत*' किंवा एके ठिकाणी '*पावसाच्या फुललेल्या निखाऱ्यांवर भाजली जाणारी कोकिळेची कुहक*' येते, जी वाचकाला थेट भिडते.

'झटंउपट' करणारी माणसं किंवा आयुष्यात इतकी 'झवझव' कशासाठी? असे एकदम वेगळेच शब्द येतात. शिवाय *'ठक्क आकाशावर ठिण्ण चांदण्यांवर / शुकशुकाट दिव्यांवर'* अशा रचना असतात. *'... कडुलिंबाच्या / मंजिऱ्यांचे वास शिवाय / मोगऱ्याचेही सहनशक्तीपलिकडचे / घणाघाती घणाघाती'*, असे वासही 'घणाघाती' असतात, तसंच 'किलबिल' ट प ट प ते. (ही लिहिण्याची पद्धत), तसंच *'वर ओलं ठारकन आकाश'* असे भलतेच पण मजेदार शब्द एकत्र वापरलेले असतात किंवा नवीन जुळवलेले शब्द येतात; जसं : ऑफिसमध्ये तो *'गमशुदा'* (शादीशुदा किंवा गुमशुदा सारखा), किंवा परग्रहावरचे सजीव-निर्जीव *'माझ्या विश्वजाणिवेचा अतूट अंश असतील ... मी त्यांना माझ्याळवीन / मी मला त्यांच्याळवीन'* हे माणसाळवीनच्या धर्तीवरचे शब्द. असे शब्द एक पुसट हसू उमटवतात.

विरामचिन्हं अभावानं म्हणजे अगदी अपवाद म्हणूनच वापरलेली दिसतात. कित्येकदा अभिप्रेत जागी शब्द तोडलेले नसतात किंवा वाक्यं कुठेही तोडलेली असतात. बऱ्याच ठिकाणी शुद्धलेखनाशीही संबंध तोडलेला असतो. जसं *'ज्येष्ठनाग्रिक'* किंवा *'मुल्गा-मुल्गी'*. इथे दिलेल्या 'आधीच्या कविता'मधल्या कविता 'दोन' मध्ये 'सेंटर ऑफ गॅलेक्सी' नंतर येणारे दोन शब्द *'गचकन' 'तू'* हे अक्षरशः गचकन ब्रेक लावतात, धक्का देतात. पहिल्या 'पुनर्भेट' ह्या शब्दामुळेच शेवटच्या तीन ओळी आणि कविता थोडी समजू शकते. आत्मभान येतं.

भाषेचं 'रजिस्टर' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या प्रकाराच्या तर सलील वाघ ठिकऱ्याच उडवतात. कोणत्याही सांस्कृतिक-सामाजिक पातळीवरचा आणि कोणत्याही भाषेतला शब्द किंवा शब्दांश त्यांच्या कवितांमध्ये कुठेही येऊ शकतो. सलील वाघांच्या कवितेत आश्चर्य वाटावे इतके शारिर संदर्भ येतात. संस्कृत शब्दांपासून असंस्कृत, असभ्य अगदी अश्लील शब्दही अनेकदा येतात. ही कवीच्या अभिव्यक्तीची गरज असेलही, पण ते वाचतानाही बरेचदा संकोच वाटतो. कित्येकदा सलील वाघांच्या एकाच कवितेत अनेक संदर्भ, विषय किंवा कल्पना येतात. पण त्यांना एकत्रित बांधायचं सूत्र आपल्याला सापडतंच असं नाही. त्यांच्या बहुतांश कवितांना, सुरुवातीच्या तर बहुतेक सगळ्याच, शीर्षकंही नसतं. नुसते एक, दोन, तीन असे आकडे असतात; आणि जेव्हा शीर्षकं असतात, तेव्हा त्यांचं कवितेच्या आशयाशी थेट संबंध लावणं सोपं नसतं. 'ब्याऐंशी' नावाच्या कवितेत चार कडव्यांत (!) किंवा परिच्छेदांत संदर्भ आहेत : *'साठा उत्तराची सोईस्कर लाखोली'*, कस्तुरी, ब्रह्मनाडी आणि शेवटी





अनुक्रमणिका

*'डंख साधते सुफळ संपूर्ण मधमाशी'*! हे पहिल्या वाचनात एकत्र बांधणं शक्यच होणार नाही. नंतर *'चोख भूल / व्यर्थ / देशांतरी'* इत्यादी संदर्भावरून विषयाचा कयास बांधता येतो.

वाघांच्या कवितांचे शेवट खूप महत्त्वाचे आणि वैविध्यपूर्ण आहेत. बरेचदा एका ओळीत, दोन ओळींत किंवा कधी एकदम 'हायकू' ह्या काव्यप्रकाराची काहीशी आठवण करून देणाऱ्या छोट्या तीन ओळींचा. मागे दिलेल्या 'दोन' आणि चोपत्र' ह्या दोन्ही कवितांचा शेवट अशा प्रकारचा आहे. अशी खूप उदाहरणं सापडतात. 'डेट' कवितेच्या शेवटी मुलीचं वर्णन आहे : *'गुबगुबीत तळवे / टाचांचे गुलाब / केसात बोटं'* आणि मग अंतर सोडून शेवटची ओळ : *'रासरचायो'*! एकदम चपखल.

## सभोवताल आणि भाषेचं दृश्य रूप

साधारणपणे १९९०नंतरच्या कवितांमध्ये भाषा आणि सभोवताल यांचा परस्पर संबंध आणि त्याविषयीचं भान हा महत्त्वाचा आशय ठरतो. ह्या संदर्भात 'रेसकोर्स'मधल्या 'चॅट' आणि 'पाटील-कांकरिया प्रोजेक्टस' ह्या दोन कविता विशेष लक्षात राहिल्यायत. दोन्ही कवितांचा पिंड भिन्न आहे, पण दोन्ही कवितांची भाषा आपल्याला सभोवतालच्या वर्तमानाचं दर्शन घडवते. 'चॅट' हे खरोखरंच एक 'ऑनलाईन चॅट' आहे. बोलणारे कोण आहेत ह्याचा नामोल्लेख किंवा सर्वनामोल्लेखही नाही. हे सहज कानावर पडू शकेल असं छोटंसं संभाषण आपण एरवी ऐकून सोडून दिलं असतं आणि विसरून गेलो असतो. पण तेच संदर्भरहित 'कविता' म्हणून वाचल्यावर आपल्याला फार वेगळं जाणवतं आणि मजा वाटते. ह्या संभाषणातून आजची तरुण पिढी, त्यांचं व्यावसायिक जीवन, दैनंदिन जीवन, त्यांची बोलण्या-चालण्याची, विचार करण्याची पद्धत, बोलण्याची लकब, भाषांचा आलटून पालटून हायब्रीड वापर, मुला-मुलींच्या वागण्यातला मोकळेपणा असं बरंच काही प्रतीत होतं आणि ह्या पिढीचं एक प्रातिनिधिक चित्र डोळ्यापुढे उभं राहतं. ब्रेश्ट त्याच्या 'एपिक थिएटर'मध्ये जे एक धक्कातंत्र वापरतो, तसंच काहीसं हे एक धक्कातंत्र आहे. नेहमीच्या सवयीच्या गोष्टी कवितेच्या रूपानं 'डोळसपणे' बघायला लावणं, हे वाघांच्या शब्द आणि मांडणीतून नक्कीच साध्य होतं.

'पाटील-कांकरिया प्रोजेक्ट्स'मध्ये नव्वद आणि नंतरच्या दशकातल्या बाजारीकरणाचं काल्पनिक, पण खरं वाटू शकेल असं वर्णन आहे. *'स्मशानवाटिका डॉट कॉम सेन्ट्रलाइज एसी / अद्ययावत पाचशे प्रेते / जाळायची सोय बच्चेकंपनीसाठी / हॉर्सराईड रपेट क्लोजसर्किट टीव्ही / ज्येष्ठांना पिकअप ...'*. इथे अम्युजमेंटपार्क, ब्युटी

पार्लर इत्यादी आहे. तसेच चोवीस तासांत हाडे घरी पोचवण्याची सोय आहे. ह्या एका पानाच्या कवितेत कवीचा कल्पनाविलास अमर्याद आहे. सर्व सोयी, सुशोभीकरण, मनोरंजन असे विषय असूनही कविता आपल्याला सुन्न करते. बिल्डर-डेव्हलपर वृत्तीचे आणि डेव्हलपमेंट नावाच्या पिशाच्च्याचे हावरट आणि बीभत्स दर्शन इथे घडतं. इथे आठवण होते ती आळेकरांच्या 'महानिर्वाण'ची. त्या नाटकाची 'ब्लॅक कॉमेडी' म्हणून इतिहासात नोंद झाली; व ह्या कवितेची 'काळी फीत असलेली 'डेव्हलपमेंट'ची (प्रगती नाही!) परमावधी' अशी नोंद घ्यावी लागेल.

सलील वाघांची कविता अशी निरीक्षणं कोणतंही भाष्य न करता आपल्या वैचित्र्यपूर्ण भाषा-आविष्कारातून आपल्यापर्यंत थेट पोचवते. 'कंपनीतल्या कवितांची' (भाग १ ते ७) भाषा आपल्याला थेट भिडते आणि विचार करायला लावते. ह्यामध्ये '*आऊटसोर्सिंगचं भजन*' आहे, '*मेनोपॉज मॅनिया*' आहे, प्रॉडक्ट डेव्हलपमेंटच्या नावाखाली कशाचीही ट्रायल घेणं आहे, झिरो डिफेक्ट युनिटमधे दळणारं आंधळं आणि पीठ खाणारं कुत्रं आहे, एचआरडी युनिटमध्ये काहीही घडत असलं तरी आपला शांतपणे फिड्ल वाजवणारा नीरो आहे. 'कंपनी'तल्या कोणाचा एक पाय शेतात तर दुसरा कंपनीत आहे, एक पाय इमानात तर दुसरा बेईमानात आहे. तिथे दम देणारे महाभाग आहेत आणि 'राम आंबेडकर पाडवा' एकाच महिन्यात येतात ह्याची जाणीव आहे. शेवटी कंपनीचं श्राद्ध घालून तिला इंद्रायणी काठी मूठमाती दिली आहे. कंपनीच्या अंतरंगाचा वैविध्यपूर्ण भाषेतून व्यक्त झालेला अस्सलपणा इथे जाणवतो.

सभोवतालचं सामाजिक, आर्थिक, राजकीय भान 'फुटलेल्या धरणाच्या कविता', 'नरसोबाच्या वाडीच्या कविता', ह्या कवितासमूहातून, तसंच 'ऑपरेशन', 'भय्ये आले', 'सोनोग्राफी', 'पुन्हा मुंबई' अशा अनेक कवितांमधून प्रतीत होतं. जागतिकीकरणाचा रेटा, संगणकीकरण, गुन्हेगारीकरण, महानगरीकरण आणि त्यातून निर्माण होणारे प्रश्न कधी वर्णनातून तर कधी गर्भित उपहासातून समोर येतात. हा सभोवताल व्यक्त करणारी भाषिक ताकद वाचकाला अंतर्मुख करते. आशय आणि भाषा एकमेकांशी चपखल जुळतात.

पुणे-मुंबई अशा शहराचं स्वरूप, बहुराष्ट्रीय कंपन्या, बदलणारं व्यावसायिक जग, बदलणारी मूल्यं, सभोवताली होणारी चकचकीत डेव्हलपमेंट अशा अनेक विषयांचा कवितांमध्ये परामर्श घेतला आहे. 'रेसकोर्स १५ – वाट' म्हणून एक एकदम छोटी तीन ओळींची कविता आहे : '*हा आमचा रोजचा / जायचा - यायचा रस्ता होता / इथं रेसकोर्स कधी झालं ...*'. असा कवीला प्रश्न पडला आहे. (हा तर एकदम काफ्काचा प्रश्न वाटतो.) ह्या मित शब्दातून जाणवतं की सगळ्या जगाचंच रेसकोर्स झालंय,

सर्व्हायव्हलसाठी कॉम्पिटिटिव्ह जगात सगळेच पळत सुटलेत. विचार करायलाच कोणाला वेळ नाही. जाणिवा बोथट झाल्यायत. श्रीमंती फर्म्सच्या वर्णनात आहे. सोन्याचं शेण, डेडलाईन्स, रिझल्ट ओरिएन्टेड विचारसरणी, टोचणारा अमेरिकन भुंगा, बॉसच्या ज्योकला हसणारा घामेजलेला कुरियर बॉय, अप्रायजल्सच्या फैरी ... झकपक मल्टीनॅशनल कंपन्यांचं चित्र कवी *'बाणेर पाषाण औंध / थुई थुई चकाचौन्ध'* असं रंगवतो. धरणफुटीच्या कवितेत तरतऱ्हेची माणसं, माणसांची चाललेली फरपट आणि अनेक प्रतिमा-प्रसंग-संदर्भ आहेत. चलती आहे ती *'कॉंट्रॅक्टर, सप्लायर, बिल्डर / रंडीबाज नेते बेवडे कार्यकर्ते'* यांची. बाकीच्यांसाठी कर्फ्यू आहे. त्यांनी बाहेर पडायची गरज नाही. 'फुटलेल्या धरणाच्या कवितां'मध्ये मुडद्यांच्या रांगा आहेत, तशा *'टीव्ही सिरीअलला टाचलेल्या बाया'* आहेत. असा शब्दांचा वेगळाच वापर डोळ्यांपुढे चित्रच उभं करतो.

'रेसकोर्स'मधली 'गोकुळाष्टमी ते गणेशचतुर्थी' ही कविता काय, किंवा 'नरसोबाच्या वाडीच्या कविता'मधली 'सत्याचा प्रयोग' काय, किंवा 'देवदर्शन' काय, अशा बऱ्याच कवितांमध्ये श्रद्धा, अंधश्रद्धा, अनैतिकता, वासना, निराशा, औदासीन्य, माणसाची सर्वसाधारणपणे मजेची कल्पना, ह्यांना तोंड फुटतं. एकदा एकजण म्हणतो, *'नरसोबाच्या वाडीला जाऊ / तिथं पाट लाऊ'* म्हणजे काय होईल, तर तिथे *'ना तुला नवऱ्याचा धाक / ना मला बायकोचा काच / नो एन्ट्रीतून फिरू / चल नरसोबाच्या वाडीला जाऊ'*. ह्या कवितेत मुंबईच्या जीवनाबद्दल एक फार मार्मिक ओळ आहे. *'घाट सोडला की मुंबई आलं / निम्मं जगणंच बायपास झालं'*!

'सध्याच्या कवितां'मधली 'नरसोबाची वाडी'च्या 'भाग चार'मध्ये एका कवितेचं ध्रुवपद आहे : *'मलाही होऊ दे देवा तुझ्यासारखं बिंधास / घ्यायला नको लागू दे पाण्यापावसाचा अंदाज'*. ह्यामध्ये देवाची आळवणी-विनवणी करणारा म्हणतो, *'तुला १०१ एसेमेस करीन, १२१ ईमेल करीन, तुझ्या नावाचा युआरएल सगळीकडे चिकटवीन, तुला मिडीयाभर फिरवीन, एक्साईज फ्री झोनमध्ये तुझं राऊळ बांधीन, ... कर एमओयू साईन, माझ्या श्रद्धेची वॉरंटी लाईफ टाईम'*. पण कर मला तुझ्यासारखं बिनधास. ह्या कवितेचा शेवट एकदम गुग्ली आहे : *'तू तिसरा डोळा उघड आणि सगळ्यांची झोप उडव'*!

संगणकीकरण, त्यावरची जालं आणि महाजालं ह्याबाबतचे विचार काही ठिकाणी फार प्रखरपणे अभिव्यक्त झाले आहेत. 'सध्याच्या कवितां'मध्ये पहिल्या कवितेत : *'वर्ल्डवाईड शेपटीची मण्यार डसणार'*, *'लाहीलाही डाउनलोड'* होणार. अशा ओळी येतात. पुढे कवी म्हणतो : *'गडद मध्यरात्री भाषा हुंगत फिरतांना / मला हिचा वास*

*लागलाय / फाटकामधून उडी मारून / तिच्या बेडरूममध्ये शिरलोय सरळ / ह्या अमेरिकन विषकन्येनी / चाळवल्यात माझ्या दशग्रंथी वासना*'!

आपल्या कामाबद्दल, व्यवसायातल्या नैतिकतेबद्दल कवीच्या मनात सतत शंका-कुशंका आणि प्रश्न उमटलेले दिसतात : '*ओशट आंबट घामट / लोकलच्या गर्भजलातून येऊन*' दादर टीटीवर जन्म होतो माझा आणि नंतर जागून जागून मी काय करतो, तर रात्री अडीचला सॅनिटरी नॅप्कीनच्या जाहिराती लिहितो! 'ये रे ये रे पावसा' ह्या कवितेत कवी म्हणतो, '*परदेशी क्लायंट हीच आमची दैवते / हेच भाग्यविधाते / हेच आमचं भावविश्व / हीच आमची दुनिया*'. इथे सामान्य माणसाची फसवाफसवी होत असते, व्यवसायात खोटेपणा असतो, अनैतिकता असते. हे '*गंडान्तराच्या सावटाभोवती / रेंगाळणारे दिनक्रम आहेत*'. 'माळावरच्या पावसात'मध्ये आहेत '*काचेच्या कपाटातले डायरेक्टर्स / लंब्याचवड्या मिटिंगनंतरचा सन्नाटा / - आवाज फक्त एसीचा*'.

## भाषा आणि कविता

इतर विषयांपासून अलग असे 'भाषा' आणि 'कविता' हे सलील वाघांच्या कवितेचे विषय बनले आहेत. अगदी स्वन, स्वनिम ह्यांसारख्या भाषाविज्ञानातल्या पारिभाषिक शब्दांपासून विरामचिन्हं, अक्षरं, शब्द, लिपी हे विषय बनतात. जसं एके ठिकाणी – उंच पर्वत, घनघोर अरण्यात '*स्वन फिरते / स्वन विरते / ...स्वनिम वाणी / - तुझा चेहरा / स्वनपूर्ण / स्वनसंपन्न / - स्वनमयी स्वप्नं*'. 'आधीच्या कवितां'मधल्या 'चौदा' नावाच्या कवितेत जोडाक्षरं उपमेच्या रूपात येतात. एके ठिकाणी '*करुण पावसाळ्यातली पीसीची ऊब / देवनागरी रोमन आणि नॉनरोमन / कित्येक हजार क्रॅराक्टर्समधून*' स्रवताना दिसते.

'ऑपरेशन' ही एक अतिशय प्रगल्भ कविता आहे. त्यात नोकरीची जागा, कंपनीतल्या सगळ्या माणसांची नोकरी जाण्याची चिंता, भाषा आणि अध्यात्माचा घेतलेला आसरा, त्यातून '*मी इतक्यात काही संपणार नाही*', असा मिळालेला विश्वास, सगळं संपलं तर काय होईल, ह्या सगळ्याचं वर्णन आहे. त्यात एके ठिकाणी कवी म्हणतो, निराशेच्या काळात '*माझी भाषाच मला तपासते / काटेकोर झडती घेते / लोटत लोटत काडेलोटाच्या*' अशा एका टोकापर्यंत नेते, जिथे '*मी होऊ शकतो / सूक्ष्म / आणि / तरल*' आणि मग काही ओळी : '*मी इतक्यात हरवणार / नाही त्या तेजःपुंज कल्लोळात ...*'. त्यानंतर एकदम कल्पनांचा सडा पडतो : '*मला खंडोबा होऊन / म्हाळसा-बाणाईला नांदवू दे*' किंवा '*मला आयबीएम आणि ॲपल / मर्ज झालेले पाहू*





अनुक्रमणिका

दे किंवा *'नवी दिल्लीतल्या एका तरी मार्गाला / माझ्या नावाची पाटी लागू दे'*. त्यानंतर भाषा जेव्हा दुभंगेल आणि मला पोटात घेईल .... तेव्हा *'आयुष्याच्या एका ब्रेकईव्हन क्षणी / अग्नी आणि प्रवाहीपणा / मला शुद्ध करून घेईल'*! मृत्यूची सुंदर मांडणी. दुभंगलेली भाषा पोटात घेईल तोच मृत्यू.

'सतरा' नावाच्या ('निवडक कविता') पाच पानी कवितेत भरगच्च आशय आणि कल्पक अभिव्यक्तीची समृद्धी आढळते. कवीनं परदेशात असताना फुलासारखं काहीतरी *'जपून ठेवलंवतं फार हमसाहमशी'*. जपून ठेवण्यातली वेदना अशी व्यक्त होते. आणि जेव्हा 'ती' परत दिसते तेव्हा कवीला प्रश्न पडतो, *'तू दिसता क्षणीच / शेकडो शुभवाद्य डस्ली इत्यादी सगळं / मी तुला कसं कळवू कायम ठेवू / कवितेत'*! आणखी एका कवितेत कल्पना येते : *'काही वर्षं मी आयुष्याबाहेर जगात होतो'*. नोकरीच्या, शिक्षणाच्या, परदेशी असल्याच्या निमित्तानी. काही वेळा कवी असाच 'भाषेबाहेर' किंवा 'गोलाकार पसरणाऱ्या' विश्वाबाहेरही असतो!

भाषा आणि कविता याचं परस्पर नातं, कवितेचं घडणं, असणं, कवितेचं आणि भाषेचं जीवनातलं स्थान, हे सगळं लहानमोठ्या प्रमाणात काव्याचे विषय झाले आहेत. 'निवडक कवितां'मध्ये भाषा अशी येते : *'हवेची संथ लाट / माझ्याकरता / संभाषिणी बनते / हवेतल्या हवेत माझं भाषांतर होतं / माझ्या सर्वांगीण भाषांतराचा हा मुहूर्त / हुकला तर परत येणार नाही / हा सोहळा माझ्या समूळ लिप्यन्तरणाचा'*. 'सध्याच्या कवितां'मधल्या मुंबईच्या संदर्भातल्या ओळी आहेत : *'प्रमाणभाषेच्या रडारवर / न दिसू शकणारी / ओलसर जाणिवांची मुळं / भाषेची संगत सुटतीय / मुंबई अंगावर येतीय / भाषेची संगत सुटतीय'*. मुंबईच्या भाषेसंबंधातलं आणि कवीच्या भाषेशी असलेल्या नात्याचं हे एकदम साधं, सरळ वर्णन आहे. निवडक कवितांमधल्या 'सत्तावीस' नावाच्या कवितेत कवी आणि प्रेयसी यातलं नातं दिसतं. कित्येक अनुभव घेतले, पण नजर गडद नाही झाली 'तुझ्या समुद्रासारखी'. मग 'तू' कोण हे सांगणाऱ्या असंख्य कल्पना. शेवटच्या ओळी आहेत : *'तू गुणाची / तू काव्य गुणाची / काव्यधर्मी काव्यापैकी / दशांगुळे उरणारी / तू / ग'*!

भाषा आणि कवितेला जोडणाऱ्या, एक प्रकारे कवितेची व्याख्या करणाऱ्या काही जागा आहेत. त्यात कवीच्या भाषेशी असलेल्या संघर्षाचीही अभिव्यक्ती आहे. कवी म्हणतो : *'विकोपाला गेलेल्या / शब्दांची भाषा होते कविता / वाक्प्रचाराच्या वशीकरणाचा मंत्र / म्हणते कविता'*. 'निवडक कवितां'मधल्या जाणवण्या इतक्या कवितांमध्ये कविता डोकावते. *'माझ्या कवितांमधलं काव्य / तत्त्वज्ञानातलं तत्त्व / त्यांच्या त्यांच्या मुशींची / टणक कैद / झुगारून कचरा करून / फेकून देत / सगळ्या*

*फोलपटाचा / निरास होऊन येतं*. इथे कवी हा सूत्रधार आहे. 'सध्याच्या कवितां'च्या उपसंहारात सलील वाघांनी म्हटलं आहे, कविता म्हणजे संकेतभेद, म्हणून कविता म्हणजे स्क्रिप्टोलॉजी आणि कवी म्हणजे स्क्रिप्टॉलॉजिस्ट असतो.

इथे भाषा आणि कविता यांना वेगळं करणं केवळ अशक्य आहे. एका कवितेत कवीची सैरभैर अवस्था आणि प्रसवकळा शब्द होतात : *'माझी प्रेमळ चिडखोर अक्षरं / सैरभैर कावरीबावरी होतात / त्यांना आपण कुठल्या शब्दाचे आहोत तेच कळत नाही'*, कारण कवीची कल्पनाशक्ती आणि विचारांची भरारी इतकी गतिमान असते, की हात त्या गतीनं चालूच शकत नाही. एका कवितेत कवी म्हणतो,*'उगीच जबडे दुखावले प्रश्नांच्या बडबडीनं / अन पळ काढला. खरी उत्तरं आली / तेव्हा भीतीनी बसून राह्यलो। कवितेच्या टिकाऊ वळचणीला / बेमालूमपणे'*. ह्या सुंदर ओळींतून व्यक्त होतो कवीला कवितेतून मिळणारा आसरा, भरोसा, दिलासा. एका कवितेत कवी म्हणतो : *'दंतकथेचे रस्ते तुला परीकथेचे डोळे / लोककथेचं अस्तित्व तुला / माझ्या आर / माझ्या पार / लिपी तुझं अंग अंग / कविता तुझी मातृभूमी'*. किंवा दुसऱ्या कवितेत ओळी येतात :*'पाश्चिमान आकाशाच्या आत्मीयतेचे / खंडकाव्यासारखे मेन्टेन्ड लयीचे / लागोपाठ दिवस / अपरिहार्य ठळकपणे / मुद्रित झालेत माझ्यावर'*. कवितेपुढे कवीचा नाइलाज आहे, पण परदेशातल्या कठीण दिवसांत कविता हाच इलाजही असतो.

पुढे एका कवितेत कवीची असहायता प्रकट होते. लोकांनी कितीही टीका केली, मनात शंका असल्या, तरी कवी लिहायचं थांबू शकत नाही. *'काव्याची एवढी ह्या / उलटी पाचर बसेल / असं वाटलं नव्हतं'*. कवी कित्येकदा हतबल होतो. *'लागोपाठ उद्भवत / फेर धरणाऱ्या / अवधींचा वेढा / जोरदार मी परतवतो / एकामागोमाग एक/ - थांबायची बात नसते'*. ह्याच कवितेत वैचित्र्यपूर्ण ओळी आहेत : *'माझा सडा पडलाय माझ्या आजूबाजूला / मी चालत येतोय माझ्याकडे चहुबाजुंनी / माझ्या समुद्रावरून'*. ह्यात कवीचं विखुरलेपण आहे, भेदरलेपण आहे, कवितेचा नाइलाज आहे. ह्याच संग्रहातल्या 'नवव्या' कवितेची सुरुवात आहे, *'ते मजकूर भरले डोळे / नजरेत रिकामे झालेत / नजरेचा सीमांत झाले / असाध्य रोगासारख्या / जडल्यात कविता / नको असताना / मूठभर जगण्यात माझ्या / अटींशिवाय काहीच नाही'*. कारण एकदा त्या कागदावर उमटल्या की जबाबदारीही मोठी असते : *'लिहिलेल्या शब्दाला जागायची / अट असते पेनालाही'*. कवी म्हणतो, हा सगळा खटाटोप, सगळं समजून घेण्याची, ते परत व्यक्त करण्याची इतकी तळमळ, हाही एक 'मी'पणाच आहे. ह्या कवितेच्या शेवटच्या ओळी आहेत, *'याचसाठी केली / एवढी झवझव / मीपणाची हाव / गोड व्हावी'*. ही आळवणी करण्यासाठी वापरली आहे शेवटी एक अचानक अभंग रचना.

तसंच 'सध्याच्या कवितां'मधली 'सोनोग्राफी'. ह्या कवितेचा शेवट आहे *'हे ब्रह्मचिकित्सेचं अनिवार्य / औधत्य मला माफ असो'*. माझ्यासारख्यानं ब्रह्मचिकित्सा करणं हे औधत्य आहे, पण ते अनिवार्य आहे!

भाषा, कवी आणि कविता ह्या त्रिकुटाभोवती फिरणाऱ्या आणखीही काही कविता 'निवडक कवितां'मध्ये आहेत. त्यात अभिव्यक्तीसाठी भाषेशी झटापट होताना दिसते. 'पस्तिसा'व्या कवितेत कवी म्हणतो, *'भाषेचा धाक नाही मनाला'*. पुढे तिचा शेवट आहे, *'चंचल वैमनस्य भाषेच्या टापूत शब्दोशब्दी / - समारोपाची अवज्ञा / शब्दार्थांचा अघोरी पाऊस'*. वैमनस्यातही कवितेचा समारोप नाही, उलट अर्थांचा पाऊस आहे! 'आषाढस्य प्रथम दिवसे'मध्ये सादळलेल्या मुंबईबरोबर शब्दही सादळतात. मुंबईत लोकलमधून जाताना *'कल्याण बोगीची खिंड लढवतात / रोज अप-डाऊन करणारे मावळे / दबकत भाषेच्या अंडरवर्ल्डमधून फिरणारा मी / रप रप पाऊस / सादळलेली मुंबई / सादळलेली भाषा'*. कवितेचा शेवट होतो : *'तुझ्यात अंतर्धान पावते भाषा / भाषेत तू क्षणोक्षणी'*. म्हणजे एकप्रकारे अद्वैतच.

'मराठी भाषेची सप्तशती'मध्ये कवी मराठी भाषेची सप्तशती रचतोय. कर्नाटकात *'भाषाहीन'* होऊन राहतोय. त्याने *'शब्दांना पलिते बांधून / भाषेच्या घाटात सोडलेत'*. पण इथेही कवीच्या सवयीप्रमाणे अशी एक कल्पना येते : *'भाषेच्या गुप्तांगावर माजलंय / माझ्या कवितेचं रान'*! आणि ह्या कवितेचा शेवट होतो : *'माझ्या कवितेची मुळी थेट / ज्ञानेशाच्या नरडीला लागलीय इथून'*. आणखी काही कवितांमध्येही मराठीच्या अस्तित्वाबद्दल काळजी व्यक्त होते. *'माझी मातीमोल मराठी / भाषेची माती मी उधळतोय'*. कवी चिंतेनं म्हणतो, मराठी हटत चाललीय – बहुधा मीच शेवटचा कवी असेन मराठीतला. आणखी एका कवितेत मराठीबद्दलचं प्रेम आणि काळजी व्यक्त होते : *'मराठी भाषेची प्राणप्रतिष्ठा करताना / मी एकटा पडलोय तुंबळ एकटा / फेटाळला गेलोय / एकटा / ठेचला गेलोय / एकटा'*.

'ठसका' ही 'रेसकोर्स'मधली शेवटची कविता. ह्या कवितेत कवीनं सिग्नल तोडला, बेंबीत बोट घातलं तर इंगळी डस्ली, होळी केली, आणि शेवटी *'भाषेचा वध केला / टाक मोडून टाकला'*. ह्या सगळ्याचा *'आभाळात उडाला / ठसका'*.

## समारोप

भाषेच्या उपयोजनातली विविधता आणि प्रयोगशीलता हे सलील वाघांच्या काव्याचं व्यवच्छेदक लक्षण आहे. गेल्या तीस-पस्तीस वर्षांत लिहिलेल्या बहुसंख्य कविता भाषेच्या वैचित्र्यामुळे वाचकाला गुंतवून ठेवतात. परत परत वाचायला भाग





अनुक्रमणिका

पाडतात. सलील वाघांची कविता बहुतांशी विखुरलेली, फ्रॅग्मेंटेड आहे. प्रत्येक शब्द आणि प्रत्येक ओळ एक मोठं अवकाश घेऊन येतं.

अभिव्यक्तीचा संबंध जाणिवा-नेणिवांमधल्या अस्वस्थपणाशी असतो. ही अस्वस्थता, भावनांचा उद्रेक, कधी अरवाळ-शिवराळ भाषेतून, कधी कल्पनातीत सुंदर रूपकांमधून, कधी नवीन शब्दसमुच्चयातून, तर कधी कवितेच्या वेगळ्या, दृश्य मांडणीतून दृग्गोचर झालेला दिसतो. त्यांची भाषा सद्यस्थिती आणि मानसिकतेचं दर्शन घडवते. आशय भाषा शोधत जातो.

लेखाच्या मर्यादा लक्षात घेता इथे फार थोड्या कवितांचा उल्लेख करता आला आहे. इथे उदाहरणं देतांना ओळी एकापुढे एक दिलेल्या आहेत. त्या खरं म्हणजे छापील संहितेच्या बरहुकूम देणं आवश्यक आहे, कारण त्यातून कवितेचं किंवा ओळींचं वेगळं आकलन होतं. खरं तर सलील वाघांची कविता वाचून स्वतःच तिचा अनुभव घेतला पाहिजे. म्हणून वानगी दाखल पुढे काही कविता दिल्या आहेत :

### चॅट

| | | | |
|---|---|---|---|
| 08.00 | you | : | > hi |
| 08.05 | you | : | > hi hw r u … r u thr |
| 08.06 | me | : | > am everywhere |
| 08.06 | you | : | > shutap no keeding |
| 08.07 | me | : | > k baba k |
| 08.08 | me | : | > aaj kai program |
| 08.09 | you | : | > office madhyech |
| 08.09 | me | : | > ushir honar? |
| 08.10 | you | : | > bahutek ase distey :( |
| 08.11 | you | : | > tension aahe jara |
| 08.12 | me | : | > tension aani tula? don tell |
| 08.13 | you | : | > no am serious |
| 08.14 | me | | > ratri bhetu jewayala javuya |
| 08.15 | you | : | > nako aaj nako parva jauya |
| 08.15 | me | : | > hhmmm… |
| 08.15 | you | : | > tomorrow he is flying :) |
| 08.15 | me | : | > gr8 :) |





अनुक्रमणिका

'भूर्जपत्र' ह्या पाच पानी कवितेतील दोन पाने इथे दिली आहेत –

**भूर्जपत्र : (मूळ ब्राह्मी व हिब्रूतील सारदा लिपीत नकलून घेतलेले उतारे)**

---

<?xml version="1.0" encoding="utf-8" ?>
पतिपच्चंक[१] कुंठेरवन्म । सामंरसयौवंकटक्षोभात ॥
(पा. खं. डी. १३ अ. ५२)

जो त्याचा (तो) चेहेराच जो जणू काही प्रामुख्याने
(मुखकमल) निशादेवीच्या नाभीने डिजिटाईज केलेल्या
सूर्याभाँती चमकत आहे

---

</ जंगटांगोत्मजिव्हाप्रवयातस्कार्पो। पर्णत्सुगंमास्मि सुकौभि[४]ते ॥
(तत्रैव २४ अ. १३)

नव्याकोऱ्या स्कॉर्पिओमधून पान खाऊन थुंकत
जाणाऱ्या एचायव्हीपॉझिटीव नगरसेवकाप्रमाणे
सूर्याचे डोळे तळपत आहेत />

---

<=2.0/>कार्यभात्रासुसंबुद्धीक्र । पोषगंभाय क्रांतुमल ॥
(तत्रैव ९१ अ. १२४/४८)

अभिमत विद्यापीठ स्थापन केल्याच्या आनंदात
हे दारूडे (संचालक) वेश्यांगनांना पैसे द्यायला (अभिवादन)
विसरले //F$

---

नराधमायचोदूमलाय विश्यपूजककारे कर्मदरिद्रार्यक्षच्य[५] ॥
(तत्रैव २२ अ. ४)

माजावर येऊन तळमळणाऱ्या
गाढविणीकडे हा नराधम
विशुद्ध प्रेमाची मागणी करीत आहे

**माञा कुंण्डलिनी ज़ेया ध्यानमस्य प्रवक्षते ॥**

(नारस्मृतों ५६ पं. ग. हे.-भा. लि. मौ. ए.)

चॅरिटेबल ट्रस्टच्या तोऱ्यात फणकाऱ्याने सांगायचे

झाल्यास; औदु निर्दिष्ट अक्षरवन्नु वैयक्तिक अभिरुचिगे

तक्कन्ते अळवडिसिकोंडु मूलतःबदलावणेगळन्नु

माडदे बरेयबहुदु बल्लेबल्ले

**स्टुपिडचूडामणीकांचौ सरंगत्यौ तद्धिनावये ॥**

(तत्रैव ५४ मलमलमाला अ. ६वा माळा)

शिरेवर शीर चढलीय दुसरं काय !

: <rss xmlns:ssw=http://www.saleelwaghmarathi.com/
dtds/podcast-1.0.dtd
xmlns:content=http://purl.org/rss/1.0/modules/
content/
xmlns:dc=http://purl.org/dc/elements/1.1/
version=2.0">
: <channel>
<ttl>60</ttl>
<title>Racecourse</title>
<link>http://saleel.wagh.com</
link>
<language>en/marathi</language>
<copyright />
<itunes:subtitle />
<itunes:author>HighlandAmy</
<itunes:summary/>
<description/>
: <itunes:owner>
<itunes:name>

= //Athato PrashanaJidnyasa !>
<Iti Lekhanseema//>





अनुक्रमणिका

दोन

पुनर्भेट

ॲप्सीलॉन कॅप्टोलॅप्टम

पॅरलल स्पेस

$$M_r = \frac{M_0}{\sqrt{1 - \frac{V}{C}}}$$

C = speed of light in vacuum

$3 \times 10^{8}$ m/s

उला मिसरा
सानी मिसरा

पॅरलल स्पेस

सेंटर ऑफ गॅलेक्सी
गचकन्
तू



अनुक्रमणिका

**चोपत्र**

आमच्यासारख्यांनी
काय करायचं ?

राखीव कुरणावर
चरतात गुरंढोरं

विलक्षण डोंगर
उभ्या बांधाचे

दिल दर्या और गांड समंदर
पितरं कोंदट डोंगरांच्या आसमंती

इयम्  आ का श वा णी
संप्रति वारताहा षृयंताम
प्रवाचकाहा बलदेवानंद सागरहा

शेतीवाडी घाला भोकात
मटका लागला तर जाल
फॉरेनला

■





अनुक्रमणिका

## लेखकांना विनंती

लिखाण हस्तलिखित असो की टंकलिखित, ते कागदाच्या एकाच बाजूस सुवाच्य असावे, ओळींमध्ये व लिखाणाच्या चारही बाजूंना व्यवस्थित अंतर ठेवावे. लेखात इंग्रजी अवतरणे असल्यास त्यांचे मराठी भाषांतरही द्यावे. व्यक्तींची, ग्रंथांची नावे, लेखांची शीर्षके, पारिभाषिक संज्ञा इ० देवनागरी लिपीत लिहावे. अतिशय अपरिहार्य असेल अशाच ठिकाणी रोमन लिपीचा वापर करावा. लिखाणाच्या शीर्षकानंतर लेखकाने स्वत:चे नाव लिहावे. लिखाणाच्या शेवटी, थोडी जागा सोडून, पत्रव्यवहाराचा संपूर्ण पत्ता (पिनकोडसह) लिहावा. नावातील आद्याक्षरे मराठी लेखनपद्धतीप्रमाणे द्यावीत. ('ए०आर०' नको; 'अ०रा०' हवे.) लिखाणाची भाषा शक्यतो सोपी व नेमकी असावी. पुनरुक्ती, अनावश्यक शब्दयोजना, क्लिष्ट वाक्यरचना टाळावी.

लेखकाने आपले लेखन इतरत्र कुठल्याही नियतकालिकात, दैनिकात वा माध्यमात प्रकाशित झालेले नाही, प्रकाशित होण्यासाठी पाठवले गेलेले नाही वा प्रकाशित होण्याच्या प्रक्रियेत नाही, असे स्पष्ट निवेदन करणे आवश्यक आहे.

## संदर्भ कसे द्यावेत?

संदर्भ देण्याची सोयीस्कर व जागेचा अपव्यय टाळणारी पद्धत पुढे दिली आहे. या पद्धतीचाच आपल्या लेखात उपयोग करावा: लेखात ज्या ठिकाणी संदर्भ द्यावयाचा असेल तेथे कंसामध्ये संबंधित पुस्तक-लेखकाचे नाव द्यावे आणि त्यापुढे संदर्भित पुस्तक / लेखाचे प्रकाशनवर्ष द्यावे. त्यानंतर, आवश्यक असल्यास, स्वल्पविराम देऊन पृष्ठक्रमांक लिहावा व कंस पुरा करावा. लिखाणाच्या अखेरीस 'संदर्भसूची' मध्ये संदर्भातील सर्व तपशील द्यावेत. सूचीतील प्रत्येक नोंदीतील तपशीलांचा क्रम साधारणपणे असा ठेवावा : लेखकाचे आडनाव, स्वल्पविराम, नावांची आद्याक्षरे, प्रकाशनवर्ष, ग्रंथाचे शीर्षक, पूर्णविराम, प्रकाशनसंस्था, स्वल्पविराम, प्रकाशनस्थळ, पूर्णविराम. संदर्भसूची मराठीच्या वर्णक्रमानुसार असावी.





अनुक्रमणिका

# यशवंतराव कानिटकर : मूर्तिमंत सौजन्यमूर्ती

वि०दा० सामंत

मूर्तिमंत सौजन्य अशा शब्दांत ज्यांचे वर्णन करता येईल अशा काही व्यक्ती कायम स्मरणात राहतात. वयाच्या ९४व्या वर्षी, अलीकडेच कालवश झालेले महाराष्ट्र राज्याचे माजी भाषा संचालक यशवंतराव कानिटकर हे ह्यांपैकी एक होत.

१९६० साली महाराष्ट्र राज्याची स्थापना झाल्यानंतर मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाण ह्यांनी मराठी भाषेच्या समृद्धीसाठी काही विभागांची स्थापना केली. भाषा संचालनालय हे त्यांपैकी एक. शासकीय, सांस्कृतिक व सामाजिक/शैक्षणिक अशा सर्व क्षेत्रांमध्ये मराठीची अभिवृद्धी व्हावी ह्या सद्हेतूने अत्यंत गुणी, विद्वान व भाषावैज्ञानिक अशा व्यक्तींची नेमणूक भाषा संचालनालयात संचालकपदावर करण्यात आली. डॉ० वा०ना० पंडित, डॉ० आराध्ये, डॉ० वा०म० कुलकर्णी ह्यांसारख्या सर्वथैव समर्थ व्यक्तींनी हे संचालकपद भूषविल्यानंतर, १९७५मध्ये यशवंतराव कानिटकरांनी संचालकपदाची जबाबदारी हाती घेतली. राजभाषा मराठीविषयक धोरणाचा पाठपुरावा करणे, परिभाषा कोशांची निर्मिती, अमराठी कर्मचारी व अधिकारी ह्यांच्यासाठी मराठी परीक्षांचे आयोजन करणे, केंद्र व राज्य अधिनियमांचे अनुवाद करण्याच्या प्रक्रियांची काटेकोर अंमलबजावणी करणे अशा बऱ्याच क्लिष्ट कामांची योजना व आखणी त्यांनी केली. पाच महत्त्वाच्या परिभाषा कोशांच्या संपादनाचे काम त्यांच्याच काळात झाले. आपल्या अत्यंत सोज्वळ, शांत व संयत स्वभावाने कार्यालयातील कर्मचारी अत्यंत प्रभावित होत असत. त्यांची परिणामकारक वक्तृत्वशैली, शिवाय अधूनमधून नर्म विनोदाची पखरण अशा वैशिष्ट्यांची आजही त्यांचे जुने सहकारी व कर्मचारी आठवण काढतात.

भाषासंचालक पदावरून १९८० साली निवृत्त झाल्यानंतर लगेचच त्यांनी पुण्यात स्थलांतर करण्याचा निर्णय घेतला. लेखन, वाचन, चिंतन ह्यांत आनंद घेण्याचा त्यांचा उद्देश होता. सुमारे २५ वर्षे त्यांचा पुण्यातच मुक्काम होता. साहित्य संस्कृती मंडळाने पुरस्कृत केलेल्या मराठी-मराठी शब्दकोशाचे प्रमुख संपादक म्हणून त्यांनी सूत्रे हाती घेतली. मोजकेच सहकारी घेऊन त्यांनी काम सुरू केले आणि सुरुवातीची काही वर्षे काम व्यवस्थित चालले देखील. परंतु शासकीय खाक्यामुळे व अनेक अडचणींमुळे कोशाचे काम रखडत गेले. बऱ्याच वर्षांनी मधु मंगेश कर्णिक अध्यक्ष झाल्यानंतर त्यांनी डॉ० रामदास डांगे ह्यांच्या मदतीने ह्या कामाला काही प्रमाणात चालना दिली.





अनुक्रमणिका

भाषा संचालनालयाच्या सर्व विभागांतील कनिष्ठ कर्मचाऱ्यांसह सर्वांची ते नावानिशी आठवण काढीत – अगदी गुणावगुणांसह! ते संचालक व उपसंचालक असताना त्यांच्या विधिविभागात त्यावेळी सत्त्वशीला सामंत ह्या साहाय्यक संचालक व उपसंचालकपदावर कार्यरत होत्या. ह्या विभागात त्यावेळी न्यायव्यवहारकोशाचे काम चालू होते. ह्या कामातील सत्त्वशीला सामंत ह्यांच्या अभिदानाची त्यांना अगदी सखोल जाणीव होती. अगदी अलीकडे सत्त्वशीला सामंत ह्यांच्या निधनानंतर (२०१३) त्यांनी मला दूरध्वनी केला. त्यांच्या आवाजावरूनच ते खूपच अस्वस्थ झाल्याचे जाणवले. नंतर पुन्हा एकदा दूरध्वनीवरून त्यांनी "सामंत बाईंनी न्यायव्यवहारकोशाच्या संदर्भात जे काम केले त्याबद्दल 'भाषा आणि जीवन'मध्ये काही लिहायचे आहे. आता वयोमानानुसार विस्मृती होते. तर ह्या न्यायव्यवहारकोशाच्या तत्कालीन सदस्य-मंडळामध्ये कोण-कोण व्यक्ती होत्या त्यांची नावे तुम्ही मला सांगू शकाल का? अशी त्यांनी मला विचारणा केली. सुदैवाने माझ्याकडे न्यायव्यवहारकोशाची नवीन प्रत उपलब्ध असल्याने त्वरित त्यांच्याशी संपर्क साधून त्या सदस्यांची नावे त्यांना कळविली. वयाच्या ९२व्या वर्षी ही आस्था व तळमळ पाहून मी अक्षरशः नतमस्तक झालो!

निवृत्तीनंतर पुण्यात असताना एरंडवणे येथे आपल्या छोट्याशा सदनिकेत ते राहात. बऱ्याच वेळा मी त्यांना भेटण्यास जात असे. खूप गप्पा होत. साहित्य, पुस्तके, विद्वान मित्रमंडळी, त्यांचे वाद-संवाद-व्याख्याने असेच विषय असायचे.

वर्षातून दोनतीनदा ते मुंबईला मुलाकडे जायचे. धाकटा मुलगा गंभीर आजारी झाला. त्याला पुण्याला आपल्या घरी आणून त्यांनी शस्त्रक्रिया व वैद्यकीय उपचार करवून घेतले. वयाच्या ८०व्या वर्षीदेखील शक्य तितकी त्याची सेवा केली. मुलाची स्थिती पाहून त्यांनी वाईट वाटे, पण शेवटी यश आले नाहीच. एका प्रेमळ पित्याच्या अंतःकरणाचे प्रत्यक्ष दर्शन आम्हांला झाले.

पुण्यात असताना बऱ्याच वेळा त्यांची रस्त्यात गाठ पडायची. संध्याकाळी ५ वाजण्याच्या सुमारास ते एरंडवण्यातून डेक्कनपर्यंत पायी यायचे. तेथे ठरावीक ठिकाणी एकत्र जमून चहापानाबरोबर सर्वांच्या विद्वद्गोष्टी चालत. वि०ग० कानिटकर, ह०अ०भावे व अन्य एकदोघे हे त्यांचे नेहमीचे स्नेही. संध्याकाळी उशिरा रिक्षाने घरी परतायचे. नेहमीचा हा क्रम अगदी वयाच्या ८३व्या वर्षापर्यंत चालू होता.

मोकळ्या वेळात त्यांनी बरेच वाचन व लेखनही केले. टिळक स्मारक ट्रस्टतर्फे प्रकाशित करण्यात आलेल्या 'लो० टिळक यांचा भाषाविचार' ह्या पुस्तकाचे संपादन त्यांनी केले, त्याचप्रमाणे 'समग्र टिळक खंड ८'चेही संपादन केले. मराठी भाषेविषयीची





अनुक्रमणिका

त्यांची विलक्षण आस्था व व्यासंग त्यांच्या 'मराठी भाषा – स्वरूप आणि उपयोजन' ह्या स्वतंत्र ग्रंथातून दिसून येतो. याशिवाय 'ते दिवस ती माणसे', 'आज इथे तर उद्या तिथे', 'पश्चिम वारे' ह्या ग्रंथांचेही लेखन केले.

यशवंतरावांचा जन्म (१९२१) मराठवाड्यातला. बीड जिल्ह्यातील लिंबागणेश हे त्यांचे मूळ गाव. मराठवाड्यात जन्म घेऊन तेथेच शिक्षण (उस्मानिया विद्यापीठातून त्यांनी मराठी विषय घेऊन एम.ए. पदवी संपादन केली होती) व नोकरीची सुरुवात (त्याच विद्यापीठाच्या भाषा विभागात त्यांनी अनुवादक म्हणून काम केले होते) झाल्याने मराठीबरोबरच उर्दूमध्येही त्यांनी प्रावीण्य संपादन केले. शिवाय हिंदी व इंग्रजी ह्या भाषांवरही त्यांचे प्रभुत्व होते. भिन्न भाषांमधील भगिनीभाव आणि परस्पर साह्चर्य हा त्यांच्या चिंतनाचा विषय बनला. त्यामुळे पुढे 'इंग्रजी-मराठी समीक्षा संज्ञाकोश' तयार करताना त्याचा त्यांना फार उपयोग झाला.

मराठी भाषेच्या विषयी त्यांचे विचार अत्यंत सखोल व तितकेच सुस्पष्टही होते. एके ठिकाणी ते म्हणतात, "संतमहंतांनी ह्या 'मराठीचिये नगरीं ब्रह्मविद्येचा सुकाळु' केला आणि अध्यात्माची पेठ वसवली तशी भौतिक-विद्यास आधुनिक शास्त्रे ह्यांच्या पेठाही ह्या नगरीत वसल्या पाहिजेत."

मराठीची परिभाषा निर्माण करण्याच्या कामी यशवंतराव कानिटकरांचे विचार सर्वांनाच प्रेरणादायी आहेत ह्यात शंकाच नाही. भाषेची शब्दसंपत्ती वाढविणे, तसेच सर्व विषयांमध्ये भाषेचा वापर करणे व मुख्य म्हणजे त्या भाषेत लेखन करणे हे पथ्य पाळले व अशा प्रकारचा निर्धार शासनाने तसेच ज्ञान-विज्ञानावर लिहिणाऱ्या सर्व लेखकांनी व विचारवंतांनी केला तर मराठी भाषेचे भवितव्य अत्यंत उज्ज्वल आहे असे निःसंशय म्हणता येते, अशी त्यांची श्रद्धा होती.

■



# मराठी ग्रंथसूचिकार शरद केशव साठे

सुशान्त शंकर देवळेकर

१९५१ ते १९८५ ह्या ३५ वर्षांत प्रकाशित झालेल्या मराठी ग्रंथांची (सुमारे ४२७९९ ग्रंथ) विषयवार सूची (मराठी ग्रंथसूची भाग ३ ते ६) सिद्ध करणारे मराठी-ग्रंथ-सूचिकार श्री० शरद केशव साठे ह्यांचे दि. १ ऑक्टोबर २०१५ रोजी निधन झाले. संकल्पित कामापैकी १९८६ ते १९९० ह्या ५ वर्षांचे काम मात्र त्यांच्या निधनामुळे हे काम आता अपूर्ण राहिले आहे.

१८०० ते १९५० ह्या दीडशे वर्षांच्या कालखंडात प्रकाशित झालेल्या मराठी ग्रंथांची (एकूण २६६०७ ग्रंथ) विषयवार सूची करण्याचे प्रचंड काम १९३४ ते १९६१ ह्या २७ वर्षांत अथक प्रयत्नांनी श्री० शंकर गणेश दाते ह्यांनी मराठी ग्रंथसूची भाग १ [१८०० ते १९३७] (१९४४) आणि मराठी ग्रंथसूची भाग २ [१९३८ ते १९५०] (१९६१) रचून सिद्धीस नेले. प्रत्येक पुस्तक प्रत्यक्ष पाहून त्याची माहिती त्यांनी नोंदवली आहे.

१९५१ ते १९९० ह्या कालखंडातील मराठी ग्रंथांची सूची करण्याचे काम श्री० साठे ह्यांनी सुरू केले होते. हे काम प्रकल्प म्हणून राज्य मराठी विकास संस्थेने स्वीकारले आणि प्रकाशित केले.

आपल्या ग्रंथसूचीला आधार म्हणून साठे ह्यांनी पुढीलप्रमाणे आधारसामग्री निश्चित केली :

१. ग्रंथवितरण-अधिनियम (डिलिव्हरी ऑफ बुक्स ॲक्ट), १९५४ अन्वये भारतातील प्रत्येक प्रकाशकाने आपल्या प्रकाशनाची एक प्रत ह्या ग्रंथालयाकडे विनामूल्य पाठवणे बंधनकारक आहे. त्यांच्या आधारे राष्ट्रीय ग्रंथसंग्रहालय, कोलकाता ह्या संस्थेद्वारे १९५८पासून मराठीसह एकूण १४ भारतीय भाषांतील ग्रंथांची, इंग्लिश भाषेत व लॅटिन लिपीत प्रकाशित होणारी राष्ट्रीय ग्रंथसूची.

२. ग्रंथनोंदणी-अधिनियम (प्रेस रजिस्ट्रेशन ऑफ बुक्स ॲक्ट), १८६७ ह्या अधिनियमाप्रमाणे, महाराष्ट्रात छापलेल्या प्रत्येक ग्रंथाची प्रत अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने (एक्झामिनर ऑफ बुक्स ॲण्ड पब्लिकेशन्स), मुंबई





अनुक्रमणिका

ह्या कार्यालयाकडे प्रत्येक मुद्रकाकडून येणे अपेक्षित असते. त्याआधारे ह्या कार्यालयाकडून प्रकाशित होणारी विषयवार ग्रंथसूची

३. शासकीय विभागीय ग्रंथालय, पुणे ह्यांनी १९५१ ते १९५७ ह्या काळात प्रकाशित केलेल्या ७ वार्षिक सूची.

ह्या तीन ठिकाणच्या सामग्रीचे एकत्रीकरण करून ग्रंथसूची रचण्याचा संकल्प शरद साठे ह्यांनी केला.

मात्र प्रत्यक्षात ह्यापैकी कोणत्याही ठिकाणी सर्वच्या सर्व ग्रंथ पाठवण्यात येत नसल्याने मराठीतील सर्वच्या सर्व ग्रंथ जमा होत नाहीत. त्यामुळे साठे ह्यांनी मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई, मराठी ग्रंथसंग्रहालय, ठाणे आणि मराठी ग्रंथसंग्रहालय, पुणे ह्या ग्रंथालयांतील दाखल-नोंदवह्यांवरून त्यांचा ग्रंथसंग्रह ताडून पाहून मूळ आधारसामग्रीत नसलेल्या ग्रंथनोंदींची एक पुरवणीसूची ग्रंथसूचीला जोडली.

साठे ह्यांनी ग्रंथकार, ग्रंथनाम, विषय, प्रकाशक, प्रकाशनस्थळ, अनुवादित ग्रंथ, ग्रंथमाला, टोपणनाव अशा विविध घटकांच्या निर्देशसूची ग्रंथसूचीला जोडल्या आहेत. ग्रंथसूचींच्या आधीच्या भागातील दुरुस्त्या आणि भर ह्याबाबची माहिती त्यांनी नंतरच्या भागात दर्शवली आहे. ग्रंथसूचींमध्ये वैविध्यपूर्ण भर घालण्याचा त्यांचा प्रयत्न असे. उदा० ६व्या भागाला जोडलेल्या ग्रंथकार-अल्पपरिचय-कोशात ग्रंथकाराचा जन्माचे/मृत्यूचे दिनांक, शिक्षण, व्यवसाय, वास्तव्याचे ठिकाण, पत्ता आणि संपर्कक्रमांक इ० माहिती कष्टपूर्वक मिळवून नोंदवली आहे. हे काम करण्यासाठी साठे ह्यांनी १९९६ ते २०१५ अशी १९ वर्षे वेचली. बँकेतील नोकरीतून त्यांनी स्वेच्छानिवृत्ती पत्करून सूचिकार्यासाठी स्वतःला वाहून घेतले होते.

मराठी ग्रंथसूचीचे काम हाती घेण्याआधी त्यांनी विविध तऱ्हेच्या शब्दसूची रचण्याचे काम केले होते. अमृतानुभवाचा पदसंदर्भकोश (१९८९) हा कोश मराठी संशोधन-मंडळ व मुंबई विद्यापीठ ह्यांनी संयुक्तपणे प्रकाशित केला. पदसंदर्भकोशात ग्रंथात आलेला प्रत्येक शब्द ग्रंथात कुठे आला आहे तसेच तो ज्या ओळीत वापरलेला आहे त्या ओळीचा मजकूर, ग्रंथातील पुनरुक्त शब्द, त्यांची वारंवारता, ग्रंथातील अनन्य शब्द इ० माहिती नोंदवलेली असते.

श्री० साठे ह्यांनी केलेली इतर कामे म्हणजे ज्ञानेश्वरीची ओवीसूची (१९९४, ज्ञानदेवी ह्या त्रिखंडात्मक प्रकाशनाच्या तिसऱ्या भागात समाविष्ट), मर्ढेकरांच्या कवितांची चरणसूची आणि शब्दसूची (अप्रकाशित), ज्ञानेश्वरपंचकाच्या अभंगांची चरणसूची आणि शब्दसूची (अप्रकाशित) तसेच ज्ञानेश्वरांच्या चांगदेवपासष्टीची

चरणसूची आणि शब्दसूची (अप्रकाशित). ह्या सूची बांधणी करून त्यांनी मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या संदर्भ विभागात दिल्या होत्या. ह्यांपैकी काही काम अलीकडे मराठी संशोधनपत्रिकेतून प्रकाशित करण्यात आले आहे. मराठी ग्रंथसूचीआधीच्या ह्या कामांसाठी ११ वर्षांतील जवळजवळ ७००० तास वेचल्याचे त्यांनी एका ठिकाणी नोंदवले आहे. अभ्यासकांचा वेळ आणि श्रम वाचवणारी संदर्भसाधने सिद्ध करण्याचे हे काम कोणत्याही प्रसिद्धीची आस न बाळगता साठे सरांनी केले. त्यांच्या स्मृतींना विनम्र श्रद्धांजली.

■

## परिभाषा-निर्मिती

अनिवार्य असेल तिथे संस्कृतचा आधार घ्यावा लागला असला तरी त्याच्यामागे काही एक विशिष्ट भूमिका आहे. महाराष्ट्राचा मुख्य सचिव हा बिहारच्या सचिवाशी जेव्हा पत्रव्यवहार करील तेव्हा त्या दोघांनाही कुठल्यातरी एका संपर्क-भाषेचा आश्रय घ्यावा लागेल व अशा वेळी दोघांचीही पदनामे जर एकच असतील तर संपर्क प्रस्थापित करण्याच्या दृष्टीने ती मोठीच सोय होईल. म्हणून 'सरचिटणीस' वा 'पंतसचिव' हा शब्द मराठीला जवळचा वाटत असला तरीदेखील 'मुख्य सचिव' ह्या शब्दाची निवड करणे अखिल भारतीय भूमिकेतून इष्ट ठरते. संस्कृतचा थोडासा अतिरेक वाटत असेल तर तो महाराष्ट्र राज्याने स्वीकारलेल्या ह्या अखिल भारतीय भूमिकेमुळेच. अर्थात जिथे असे शब्द मराठी परंपरेच्या विरुद्ध असतील, तिथे असे शब्द स्वीकारण्यात आलेले नाहीत. हे 'शिक्षा' ह्या शब्दाऐवजी स्वीकारलेल्या शिक्षण ह्या शब्दावरून किंवा यातायात, समर्थन ह्या शब्दांऐवजी स्वीकारलेल्या दळणवळण, पाठिंबा ह्या शब्दांवरून उघड होते. सर्व भारतीय भाषा, ह्या संस्कृतोद्भव असल्या व सर्वांनी संस्कृतातून सर्व प्रकारे उसनवारी केलेली असली तरी मूळ संस्कृत शब्दांचे भिन्न अर्थ निरनिराळ्या भाषांत रूढ आहेत. अशा वेळी आपल्या भाषेची प्रवृत्ती व प्रकृती लक्षात घेऊन शब्दनिश्चिती करावी लागते व तसे धोरण भाषा सल्लागार मंडळाने स्वीकारलेले आहे. शब्दनिश्चिती करताना त्या शब्दांचा प्रत्यक्ष भाषेतील प्रयोगही लक्षात घ्यावा लागतो, त्या शब्दामुळे साधित शब्द बनविता येतील किंवा कसे हेही बघावे लागते व एकूण भाषेच्या प्रवाहात एकजीव होण्याच्या दृष्टीने तो शब्द किती उपयुक्त आहे ह्याचे अवधानही ठेवावे लागते. अशी त्रिविध अवधाने बाळगून तयार झालेली भाषा (परिभाषा) ही मराठी भाषिकांच्या मनीमुखी खेळू लागेल व तिचा घरीदारी सर्वत्र सर्रास वापर होऊ लागेल.

- य॰शं॰ कानिटकर

('लोकराज्य' – जागतिक मराठी परिषद विशेषांक १९८९)

*प्रेषक : वि॰दा॰ सामंत*

# समर्थ रामदास४००.इन

श्रद्धा काळेले

समर्थ रामदास हे महाराष्ट्रातील शिवकालीन कवी आणि समर्थ-संप्रदायाचे संस्थापक. प्रपंच आणि परमार्थाची सांगड घालणारे रामदास हे वैशिष्ट्यपूर्ण महाराष्ट्रीय संत होते. मराठी वाङ्मयात विविधांगी अमूल्य साहित्याची त्यांनी भर घातली. दासबोध हा समर्थांचा प्रमुख ग्रंथ. दासबोध व मनाचे श्लोक ह्या त्यांच्या रचनांची विविध भाषांतील अनेक भाषांतरे उपलब्ध आहेत. समर्थांनी विविध विषयांवर विपूल लेखन केले आहे. असा हा रामदासांच्या वाङ्मयाचा ठेवा समर्थरामदास४००.इन (www.samarthramdas400.in/) ह्या संकेत-स्थळावर उपलब्ध करून देण्यात आला आहे. ह्या संकेतस्थळावर देवनागरी व रोमी अशा दोन्ही लिप्यांतील मजकूर उपलब्ध आहे.

संकेतस्थळावरील विविध विभागांपैकी 'जीवन प्रवास' ह्या विभागात रामदासांच्या चरित्राविषयीची अगदी थोडक्यात माहिती दिलेली आहे. 'वाङ्मय' ह्या विभागात सहा भारतीय भाषा तसेच एका परदेशी (जर्मन) भाषेमध्ये उपलब्ध असेलेले रामदासी साहित्य वा त्यांविषयीचे लेख उतरवून घेण्याची (डाऊनलोड करण्याची) सोय आहे. मराठी ह्या उपविभागात दासबोध हा ग्रंथ वेगवेगळ्या संगणकीय स्वरूपांत (फॉरमॅटमध्ये) (उदा० xls, ppt, doc इ० धारिकांच्या स्वरूपात) उतरवून घेता येतो. त्याचबरोबर श्रीमत्-दासबोध-शब्द-ओवी-सूची, मनाचे श्लोक, सज्जनगडावरील उपासना, कल्याणस्वामींचे हस्ताक्षर, अकरा मारुतींची माहिती, करुणाष्टके अशी अनेक पुस्तके व लेखही उतरवून घेण्याची सोय मराठी ह्या उपविभागात आहे. ह्या संकेतस्थळावर इतर भाषांमधील साहित्य हे मराठीच्या तुलनेत कमी असले तरी इथे दिलेली माहिती व उतरवून घेण्याची सोय फारच छान आहे.

डॉ० सुषमाताई वाटवे ह्यांच्या आवाजातील 'दासनवमी दासबोध आढावा', 'समर्थकृपेची वचने' आणि 'मनाचे श्लोक', तसेच चारुदत्त आफळे ह्यांच्या आवाजात समर्थ रामदासांच्या 'भीमरूपी स्तोत्रांवरील निरूपण'. मोहनबुवा रामदासी ह्यांचे 'नवविधाभक्ती' आणि समर्थ रामदासांवरील प्राचार्य शिवाजीराव भोसले ह्यांच्या व्याख्यानांचे ध्वनिमुद्रण व इतर अनेक आरत्या, प्रवचने ऐकण्यासाठी तसेच उतरवून

घेण्यासाठी श्राव्य स्वरूपात 'ध्वनी/चित्र फीत' ह्या विभागात उपलब्ध आहेत. ह्या विभागात चलभाषावरील (मोबाईल फोन) रिंगटोन तसेच तीन वेगवेगळ्या आकारांतील रामदासांची चित्रेही आहेत. 'वृत्त आणि घटना' ह्या विभागात दासबोध आणि मनाचे श्लोक ह्या ॲप्लिकेशनचा दुवा दिलेला आहे. ह्याच विभागात 'लोकप्रभा'मधील लेखांचा संग्रहही आहे आणि 'रघुवीर समर्थ मासिका'च्या अंकांचे दुवे दिलेले आहेत. ह्याच विभागात संतांच्या रौप्यमुद्रिकांच्या प्रकाशनाविषयीची माहितीही दिली आहे. 'श्रीमत् दासबोध वाचन (ध्वनी)' ह्या विभागात समग्र दासबोध श्राव्य स्वरूपात उतरवून घेता येण्याजोगा आहे. दासबोध हा ग्रंथ २० दशकांमध्ये विभागलेला आहे आणि त्याच्या प्रत्येक दशकात १० समास आहेत. त्याच क्रमाने श्राव्य धारिकांची मांडणी केली आहे. प्रत्येक धारिकेबरोबर तिच्यात असेलेले दशक, समास ह्यांबद्दलची माहिती, धारिकेचे आकारमान, धारिका संपूर्ण ऐकण्यासाठी लागणारा वेळ आणि त्यामधील ओव्यांची संख्या अशी सर्व माहिती दिलेली आहे. ह्या संकेतस्थळावर 'प्रतिक्रिया' नोंदवण्याचीसुद्धा सोय आहे. समर्थांविषयी काही माहिती असल्यास येथे ती 'सहभाग' ह्या विभागातून संकेतस्थळावर ठेवता (अपलोड करता) येते. 'आभार' ह्या विभागात शालेय विद्यार्थ्यांच्या वह्यांसाठी मुखपृष्ठे ठेवलेली आहेत. तीसुद्धा चित्रे म्हणून उतरवून घेता येतात.

माहितीच्या साठ्याच्या दृष्टीने हे संकेतस्थळ बऱ्यापैकी समृद्ध आहे. मुख्य म्हणजे धारिका उतरवून घेताना काही त्रास होत नाही तसेच संकेतस्थळावरील ध्वनिमुद्रणे सुस्पष्ट आहेत. मात्र संकेतस्थळावरील लिहिलेल्या मजकुराचे शुद्धलेखन तपासण्याची गरज आहे. उदाहरणार्थ बुध्दी > बुद्धी, एकताच > ऐकताच, भिती > भीती, राष्ट्जागृतीच्या >राष्ट्रजागृतीच्या, देशोध्दाराची > देशोद्धाराची, समर्थान्ची > समर्थांची इत्यादी. ह्याशिवाय जीवनप्रवास ह्या विभागात दिलेल्या महितीत शीर्षक आणि माहिती ह्यातील फरक स्पष्ट करणे गरजेचे आहे. तसेच ह्याच विभागात थोडक्यात दिलेली माहिती तुटक वाटते. त्यामुळे ती माहिती पण नेटकेपणे मांडण्याची गरज आहे. देवनागरी मजकुरात आंतरराष्ट्रीय आकड्यांऐवजी देवनागरी आकडे वापरले असते तर बरे झाले असते.



# उटपटांग

आजच्या लोकसत्तेच्या अग्रलेखाचे शीर्षक, 'उटपटांगांचे अंगण' असे आहे. त्यातल्या 'उटपटांग' शब्दाला मराठी समर्पक पर्याय कोणता देत येईल त्याबाबत शब्दचर्चेच्या सदस्यांना काय म्हणायचे आहे?

गजानन गुर्जरपाध्ये

लोकसत्तेचा अग्रलेख डोळ्यांखालून घातल्यावर या शीर्षकाचा संदर्भ समजला. उनाड, रिकामटेकडे, हुल्लडबाज, नियमभंगी, उन्मादी असे अनेक पर्यायी/अंशतः पर्यायी शब्द या अग्रलेखात आधीच वापरले आहेत. पण कदाचित त्यांनी भागले नसते, म्हणून किंवा हिंदीतल्या त्या शब्दाच्या ध्वनीतली मजा हवी म्हणून तो शब्द शीर्षकात वापरला असावा असे मला वाटले.

मूळ हिंदीतला शब्द दीर्घ ऊने सुरू होणारा, ऊटपटांग असा आहे. रामचंद्र वर्मा यांच्या संक्षिप्त हिंदी शब्दसागरमधे त्याचा एक अर्थ बेढब, बेडौल, वाकडातिकडा असा आहे, पण दुसरा अर्थ निरर्थक, व्यर्थ, वाहियात, असाही दिलेला आहे. त्यामुळे मराठीत अशा लोकांसाठी असलेल्या अनेक शब्दांपैकी आचरट, वाह्यात, बेलगाम, हुल्लडखोर, वगैरे कोणतेही शब्द चालतील. मला 'उडाणटप्पूंचे अंगण' असे शीर्षक तितकेच आवडले असते.

विद्युल्लेखा अकलूजकर

हिंदीतले 'ऊटपटांग' हे विशेषण माणसांना लावले जाते का? 'ऊटपटांग बातें' असा प्रयोग ऐकला/वाचला आहे पण 'ऊटपटांग आदमी' असा ऐकलेला/वाचलेला नाही.

मराठीत हा शब्द वापरायला काय हरकत आहे? आणि माणसांना हे विशेषण लावून प्रयोग करण्याने त्याचे अर्थक्षेत्रही हिंदीच्या तुलनेत विस्तारले जाईल.

मिलिंद मालशे

माझ्या अल्पमतीनुसार मराठीत असे उर्दू/फारसी (आणि कदाचित इतर भाषांमधील सुद्धा) शब्द पूर्वापार घुसखोरीमुळे इतके रुळलेले आहेत की ते वापरताना लक्षातही येत नाही. मालशेप्रभृतींनी म्हटल्याप्रमाणे खरोखरीच 'काय हरकत आहे?"...





अनुक्रमणिका

आता ह्यातील 'हरकत' हा शब्द (मराठी प्रतिशब्द कदाचित 'अडचण') माझ्यामते मराठी नाही (उर्दू?). – आणि म्हणूनच मीसुद्धा मालाशेसरांशी (?!) सहमत आहे. आता हेच पाहा ना, 'अडचण' म्हणजे सुमारे ९०% अर्थ physical 'अडथळा' (शेकडेवारी साठी क्षमस्व). 'हरकत'चा संबंध गायकीशी, तार/मंद्र द्रुत आलापीशी. म्हणूनच कदाचित 'वैचारिक अडथळा' म्हणून संभाषणाच्या पट्टीपेक्षा चढ्या आवाजात केलेल्या शाब्दिक विरोधामुळे 'हरकत' हा विस्तारित अर्थवाहक शब्द रूढ झाला असावा.

माझ्या बाळबोध विचारांना आणि विश्लेषणाला माफी (?!) चुकलो - क्षमा असावी.

चंदू बेलापूरकर

आपल्या भाषेत परकीय शब्द येऊ देत कामा नयेत हा सावरकर प्रभृतींचा आग्रह आणि अनेक परकीय शब्द आत्मसात करून इंग्लिश भाषा समृद्ध बनली ह्या दोन मतांपैकी कोणते खरे त्याबद्दल प्रा॰ मालशे यांनी मार्गदर्शन करावे. इतरांनीही आपली मते, माहिती मांडावीत असे नम्रपणे सुचवू इच्छितो.

गजानन गुर्जरपाध्ये

श्री॰ गुर्जरपाध्ये ह्यांनी विचारलेल्या प्रश्नाला पतंजलीच्या महाभाष्यात एकप्रकारे छान उत्तर दिले आहे. तो सांगतो की ज्या लोकांना घडे वापरायचे आहेत ते कुंभाराकडे जाऊन त्याला म्हणतात – अरे कुंभारा, माझ्यासाठी घडे बनवून दे, मग मी ते वापरीन. परंतु ज्याला शब्द वापरायचे आहेत तो माणूस वैयाकरणाच्या (किंवा सावरकरांच्या) घरी जाऊन असे विचारीत नाही – अरे बाबा, माझ्यासाठी शब्द तयार करून दे, मग मी ते वापरीन. दुसऱ्या भाषेतले शब्द भाषिक समाजांच्या संपर्कामुळे, व भाषिक गरजांमुळे एखाद्या भाषेत शिरतात व त्या भाषेचे अंग बनून जातात. भाषिक, धार्मिक, सांस्कृतिक अभिनिवेशाने भाषाशुद्धीचे प्रयत्न होत असतात. सावरकरी भाषाशुद्धीच्या प्रयत्नात अरबी, फारशी, इंग्रजी यांना परक्या भाषा मानून 'आपल्या' संस्कृत भाषेकडे मराठीचा प्रवाह पुन्हा उलट्या दिशेने नेण्याचा प्रयत्न होत असतो. तर तामिळनाडूमध्ये तामिळ भाषेत असलेले संस्कृत/संस्कृतोद्भव शब्द परके मानून ते काढून टाकण्याला भाषाशुद्धी समजले जाते. पुण्याला 'स्मार्ट सिटी' म्हणून दर्जा मागणारी मंडळी 'हुशार शहर' असा प्रयोग करताना दिसत नाहीत. समाजाच्या भाषिक व्यवहारावर नियंत्रण घालण्याचा अधिकार समाजाने कुणाला दिला आहे, का कोणीतरी समाजाकडून भाषाव्यवहाराचे स्वातंत्र्य काढून घेऊन त्यांच्यावर नवीन पठडी बसविण्याचा अधिकार चालवणार आहे हा खरा प्रश्न आहे. त्यावर भाषाशुद्धीसारखे प्रयोग किती अंशी सफल होतात हे ठरणार





अनुक्रमणिका

आहे. सरकारी परिभाषेच्या 'पदनामकोशा'ला त्यातल्या समाजाला अपरिचित परिभाषेमुळे कुणीतरी 'बदनामकोश' म्हटल्याचे स्मरते.

माधव देशपांडे

या दोन मतांपैकी कोणते खरे?

मते आणि तथ्ये/वास्तवे/गृहीतकृत्ये (facts) यांच्यातील एक मोठा फरक असा, की तथ्याबाबत विधाने खरी-खोटी असू शकतात, मते नव्हेत. मतांच्या बाबतीत पटणारी वा न-पटणारी असे द्विभाजन केले जाऊ शकते. अथवा 'अंशतः पटणारे मत' असेही म्हणता येते, म्हणजे द्विभाजन केलेच पाहिजे अशी सक्ती नाही.

मराठीत काही शब्द अगदी-देशी व्युत्पत्तीचे आहेत (गोदा-कृष्णा नद्यांची पश्चिमी खोरी), काही आजूबाजूच्या समृद्ध भाषांतून आलेले आहेत, काही प्राकृतांतून-अपभ्रंशांतून आलेले आहेत, काही पुन्हा नुकते संस्कृतातून आलेले आहेत, आणि काही फारसीतून, अरबीतून आलेले आहेत, काही इंग्रजीतून (वगैरे).

इंग्रजीबाबत समांतर म्हणावे तर काही शब्द अँग्लोसॅक्सन व्युत्पत्तीचे आहेत.

आता सावरकरांचे मत बघता या 'उटपटांग' शब्दाच्या संदर्भात तितकेसे महत्त्व नाही. भारताची हिंदी राष्ट्रभाषा असावी, आणि एतद्देशीय (आसिंधुसिंधुप्रदेश हा देश) व्युत्पत्तीचे शब्द मराठीत वापरावेत, या बाबी त्यांना मान्य होत्या असे वाटते. त्यांनी प्रतिशब्द सुचवले, आणि ते प्रतिशब्द रुळले, असे शब्द बहुतेक इंग्रजी-उद्भव वा अरबी-उद्भव आहेत. काही फारसी-उद्भव शब्द संस्कृतशी व्युत्पत्तिजन्य साधर्म्यामुळे मान्य केले, असे वाटते, परंतु उदाहरणे शोधून बघायला पाहिजेत.

धनंजय वैद्य

तथ्ये अर्थातच खोटी असू शकत नाहीत. परंतु ह्या यादीतील चाणाक्ष वाचकांनी सैल विधान समजूनही योग्य मथितार्थ जाणला असेलच, अशी माझी खात्री आहे.

धनंजय वैद्य

सावरकरांचा रोख मराठीला अपवित्र (नापाक) बनवणाऱ्या उर्दू, अरेबिक, पर्शिअन शब्दांवर नक्कीच होता.

मिलिंद मालशे

सावरकरांनी सुचविलेल्या संस्कृतनिष्ठ पर्यायांपैकी काही अंशतः रुजले. उदा० तारीख़साठी दिनांक. मात्र आजही राष्ट्रवादाची चाड नसणारे काही नतद्रष्ट लोक तारीख़





अनुक्रमणिका

शब्द वापरतात! खरे तर "तू परदेशी कोणत्या तारखेला जातो आहेस?" हेच अधिक रूढ आहे. त्याऐवजी "तू परदेशी कोणत्या दिनांकाला जातो आहेस?" असा प्रयोग कसा वाटतो? मला तरी विनोदी वाटतो!

माधव देशपांडे ह्यांनी आपल्या लेखनातून भाषाविषयक सामाजिक दृष्टिकोणांविषयी संस्कृत व प्राकृत यांच्या संदर्भात केलेली मांडणी विस्तृत आहे आणि मर्मदृष्टी देणारी आहे.

उर्दू, पर्शिअन, अरेबिक या जशा 'आक्रमकांच्या' भाषा तशीच इंग्लिशही! परक्या संस्कृतीने लालदेल्या वसाहतवादाविरुद्ध भूमिका घेऊन 'आपल्या' भाषेला 'आपल्या' परंपरेच्या (म्हणजे संस्कृतच्या) मदतीने 'शुद्ध' ठेवणे आवश्यक आहे, असा हा दृष्टिकोण आहे! स्वातंत्र्योत्तर काळात हिंदीने राष्ट्रांतर्गत आक्रमण केले आहे अशा भावनेतून या भाषेलाही मराठी हद्दीच्या बाहेरच ठेवावे असा दृष्टिकोण काही वर्षांपूर्वी ई-शब्दचर्चापीठावर मांडला गेला होता, हे काहींना स्मरत असेल!

मिलिंद मालशे

माझ्या स्मरणानुसार 'बदनामकोश' हा आचार्य अत्रे ह्यांच्या विडंबनात्मक बुद्धीतून निघालेला एक अत्यंत समर्पक शब्द आहे!

मिलिंद मालशे

आपल्या भाषेत परकीय शब्द येऊ देत कामा नयेत हा सावरकर प्रभृतींचा आग्रह आणि अनेक परकीय शब्द आत्मसात करून इंग्लिश भाषा समृद्ध बनली ह्या दोन मतांपैकी कोणते खरे त्याबद्दल प्रा॰ मालशे यांनी मार्गदर्शन करावे. इतरांनीही आपली मते, माहिती मांडावीत.

गजानन गुर्जरपाध्ये

(१) राज्यव्यवहारकोश हा शिवाजी महाराजांनी तयार करून घेतलेला कोश होता त्यांतील शब्द कितीसे रूढ झाले? वेगळ्या शब्दांत, त्यांच्या प्रयत्नांना कितपत यश आले ह्याची माहिती उपलब्ध आहे काय?

(२) प्रा॰ माधव देशपांडे यांच्या पत्रावरून भाषा लोकव्यवहारातून आपोआप आकार घेत असते. शासनकर्त्यांचा हस्तक्षेप अप्रस्तुत ठरतो असे सूचित होते. पदनामकोशातील अभियंतासारखे शब्द मराठीत रुळलेले दिसतात. त्यातील बोजड शब्द उपहासाचा विषय झाले हे खरेच आहे.





अनुक्रमणिका

(३) ग्रंथनिर्मिती हे भाषेच्या विकासाचे एक कारण म्हटले जाते. ज्या भाषेत मौलिक ग्रंथ लिहिले जातात ती भाषा मोठी होत जाते. ग्रंथांचा आणि बोलीभाषेचा सध्यातरी एकमेकांशी संबंध दिसत नाही.

(४) पाणी फेरले, पर्दाफाश, कार्यक्रम संपन्न झाला, उपस्थिती प्रार्थनीय आहे, तुला (तुझा नव्हे) माझ्यावर विश्वास वाटत नाही ह्यांसारखे शब्द किंवा रचना मराठी भाषेत वृत्तपत्रे, वाहिन्या यांच्या संस्कारातून रुळणे साहजिक म्हणून स्वीकारावे काय?

या प्रश्नांचा उहापोह व्हावा असे वाटते.

गजानन गुर्जरपाध्ये

शिवाजी महाराजांनी अवलंबिलेले भाषाविषयक धोरण पूर्णत्वास नेण्याइतकी उसंत व सवड त्यांना स्वतःला मिळाली नाही. त्यामुळे एका विशिष्ट अवस्थेपुढे ते धोरण प्रगत होऊ शकले नाही. त्यानंतरच्या शाहू छत्रपतींच्या व पुढे पेशव्यांच्याही काळात स्वराज्य व स्वभाषा यांच्याबद्दलचा सुरुवातीचा उत्साह ओसरला व मराठीवरची फारशीची पकड शिवकालात जी थोडी ढिलावली ती या काळात तशीच राहिली. पेशव्यांच्या चौफेर मुलुखगिरीच्या काळात भाषेकडे लक्ष देण्यास राज्यकर्त्यांना फुरसत नव्हती. शिवाय, सतत सान्निध्याने फारशी शब्दांचा परकेपणा लक्षात न येण्याइतके ते शब्द लोकांच्या अंगवळणी पडले...

पेशवेकालात शासनप्रयुक्त मराठीवरील फारशीचा प्रभाव कमी होऊ शकला नाही, ह्याचे आणखीही एक कारण असू शकते. मुलुखगिरी, स्वाऱ्या, मोहिमा यांच्या जोडीलाच ह्या काळात मराठी सत्तेच्या व पर्यायाने मराठी भाषेच्या राजकारणाचा व्याप खूपच वाढला होता. मनसुबे, मसलती, तह, वाटाघाटी, वकिली या गोष्टींना राजकारणात अधिक महत्त्व आले होते. निजाम, हैदरअली या शेजारील मुसलमानी राजवटीबरोबर पेशव्यांचा जसा संबंध आला, तसाच पुढे तो दिल्लीच्या मध्यवर्ती साम्राज्यसत्तेशीही येत गेला. ह्या कारणाने मराठीचा फारशीशी संपर्क वाढत गेला. नामधारी असली, तरी दिल्लीची पातशाहच सार्वभौम मानली जात असे. मध्यवर्ती शासनाच्या भाषेचा इतर राज्यांच्या भाषांवर राजकारणाच्या निमित्ताने होणारा परिणाम अपरिहार्य असतो. मराठीच्या बाबतीतही हेच घडले असावे. त्यामुळे शिवकालात मराठीने घेतलेले देशी व संस्कृतानुसारी वळण पेशवेकालात सुटले नसले, तरी तिला संस्कृत-फारशीच्या संकराचे स्वरूप त्याकाळी प्राप्त झाले होते.

संदर्भ - शासनव्यवहारात मराठी - समस्या:स्वरूप:प्रक्रिया, पान ६१-६२

वरील लेखांशावरून राज्यव्यवहारकोशातल्या संज्ञांची पकड पुढील काळात राहिली नाही व त्याची कारणे स्पष्ट होतात.

सावरकरांनी योजलेले सर्वच शब्द समाजाने स्वीकारले नाहीत, परंतु अनेक शब्द नुसते स्वीकारलेच नाहीत तर ते नित्याच्या वापरात दृढमूल झाले. पारिभाषिक संज्ञांची निर्मिती करण्यासाठी एकार्थता, स्पष्टार्थता, एकरूपता, सघनता, अल्पाक्षरता, सातत्य, संगती, शब्दसौष्ठव, अर्थवत्ता हे निकष* पाळले गेले तर त्या पारिभाषिक संज्ञा समाजाकडून बहुतांशी सहज स्वीकारल्या जातात. शासनाने तयार केलेल्या पदनामकोशाची अत्र्यांनी बदनामकोश म्हणून जरी खिल्ली उडवली तरी त्या कोशातल्या सर्वच संज्ञा काही टाकाऊ नाहीत; अत्र्यांच्या प्रभावामुळे शासनाच्या त्या कार्याची उपेक्षा व हानी झाली असं म्हणावे लागते. त्या कोशानंतर महाराष्ट्र शासनाने अनेक पारिभाषिक कोश तयार केले आहेत, आणि त्यांतही समाजाने सहज स्वीकारलेले कितीतरी समर्पक शब्द सापडतात, तसेच कितीतरी टाकून दिलेले शब्द सापडतात.

*Scientific and Technical Translating and other Aspects of Language Problem (UNESCO - 1957) : 7-1-13, p.213. (हा संदर्भही वरील पुस्तकातच दिला आहे.)

विजय पाध्ये

विपुल संभाषिते व नंतर परिभाषा, कोश इ॰ उपकरणे हा भाषिक विकासाचा नैसर्गिक मार्ग सोडून उलट्या मार्गाने short-cuts शोधण्याच्या भरात आपण भाषेचे नुकसान करतो आहोत

मिलिंद मालशे

प्रा॰ मालशे यांनी पदनामकोश इ॰ विषयी शासनातर्फे हाती घेतलेल्या उपक्रमांच्या विषयी लिहिले आहे त्याबद्दल दुमत होण्याचे कारण नाही. अलीकडच्या काळात निर्माण होणारे कोश विकसित तंत्रज्ञानामुळे संभाषिताच्या नोंदी उपलब्ध होऊ शकतात त्यांचा अभ्यास करून कोश निर्माण केले जातात, हे खरे आहे परंतु तंत्रज्ञान उपलब्ध नव्हते त्या काळातही पाणिनीने लोकव्यवहाराचे निरीक्षण करून व्याकरण सिद्ध केले हे देखील खरेच आहे. भाषेविषयीची आस्था आणि शास्त्रीय दृष्टी या गोष्टी राजाश्रय, पैशाची उपलब्धता यापेक्षा महत्त्वाच्या आहेत.

माझ्या टिपणात ग्रंथ भाषेची प्रतिष्ठा वाढवतात असे म्हणताना मनात ज्ञानेश्वरीसारखे ग्रंथ होते, कोश नव्हेत.





अनुक्रमणिका

क्रमांक ४चे काय? (वृत्तपत्रे, वाहिन्या हे लोकव्यवहाराचे प्रतिबिंब म्हणून स्वीकारार्ह मानावे काय?)

गजानन गुर्जरपाध्ये

भाषाविकास साधणे म्हणजे भाषेत भरपूर लेखन, विपुल ग्रंथसंपदा होणे; त्या प्रक्रियेत परिभाषा, शब्दकोश वगैरे महत्त्वाचे नसतात हे ज्ञान आम्हांला नव्यानेच झाले! आतापर्यंत आम्ही समजत होतो, की परिभाषा, शब्दकोश हे भाषाविकासाच्या प्रक्रियेत महत्त्वाची भूमिका बजावतात. त्यांच्या ह्या भूमिकेमुळे भाषेत नेमकेपणा येतो, तिचे सौंदर्य खुलते, बाहेरच्या भाषाव्यवहारांमधली अकारण घुसखोरी होऊन जे भाषिक प्रदूषण होते त्याला प्रतिबंध केला जातो आणि ह्या सगळ्या उपयुक्त बाबींमुळेच परिभाषा, शब्दकोश ह्यांना जणू शरीरातील श्वेतपेशी, रोगप्रतिकारक शक्ती मानले जाते.

नुसते भरपूर लेखन, विपुल ग्रंथसंपदा अनेक कारणांनी निर्माण होऊ शकते. शासन-कर्त्यांच्या आग्रहाने, सक्तीने, प्रोत्साहनाने ते होईलच, पण अनेक कारणांनी परप्रांतीय लोकांनी राज्यात येऊन ठाण मांडले की त्यांच्या भाषेतले शब्द, वाक्प्रचार, म्हणी वगैरे स्थानिक भाषाव्यवहारात रूढ होतील; परप्रांतीय लोक स्वभावतः किंवा संख्याबळाच्या आधारावर आपली स्वतःची भाषा, संस्कृती स्थानिक लोकांवर किंबहुना राज्यकर्त्यांवरही लादून आपले वर्चस्व प्रस्थापित करतीलच. परिणामी भाषिक व इतर सांस्कृतिक अंगांवर इष्टानिष्ट परिणाम घडणे अपरिहार्य ठरेल. असला भाषाविकास, सांस्कृतिक उन्नयन आपल्याला अभिप्रेत आहे काय? 'उटपटांग', 'पर्दाफाश' वगैरेंसारखे शब्दप्रयोग बेधडक करून आपले अग्रलेख सजवणारी; 'मुख्यमंत्री चव्हाण काँग्रेसच्या सोळा कलमी कार्यक्रमांची 'कमान सांभाळणार' असल्याचे वृत्त देणारी (वर्तमानपत्र हे घाईचे वाङ्मय असल्याने वाचकांनी तिकडे साहित्यिक, व्याकरणिक अंगांनी पाहून दोष काढत बसू नये, लोकशिक्षणाकडे व समाजप्रबोधनाच्या हेतूने वाचन करावे अशी अपेक्षा करणारी) वर्तमानपत्रे, बातम्या वाचणाऱ्या लोकांवरच भाषांतराचेही काम सोपवून त्या भाषांतराचा अचूकपणा, दर्जा वगैरेकडे लक्ष न देणारी आकाशवाणी (बलात्कार घटनेची चौकशी 'इन कॅमेरा' होणार असल्याची बातमी मराठीत देताना ह्या इन कॅमेराचं भाषांतर 'कॅमेराबद्ध' असं केल्याचं आठवावं), 'मी तुझी मदत करेन'सारखे वाक्प्रयोग सर्रास रूढ करू पाहणारी चित्रवाणी ह्यांसारख्या माध्यमांच्या द्वारे केवढा भाषाविकास साधला जातोय ते दिसतेच आहे.

विजय पाध्ये





अनुक्रमणिका

## प्रस्तुत चर्चेत सहभागी झालेल्या व्यक्तींचे संपर्क पत्ते :


विद्युल्लेखा अकलूजकर : vidyut@shaw.ca

गजानन गुर्जरपाध्ये : ggurjarpadhye@gmail.com

माधव देशपांडे : mmdesh@umich.edu

विजय पाध्ये : v.wordsmith@gmail.com

चंदू बेलापूरकर : bkbelapurkar@bajajauto.co.in

मिलिंद मालशे : milindmalshe@yahoo.com

धनंजय वैद्य : deejayvaidya@gmail.com




### भाषा शिकवणारा शिक्षक

भाषा शिकवणारा शिक्षक हा अमूक एक विषय – इतिहास, भूगोल, भौतिकी – शिकवत नसला तरी कोणताही विषय ग्रहण करताना आणि त्याची दुसऱ्यासमोर मांडणी करताना भाषा कशी वाकवायची हे शिकवत असतो. सारांशलेखन, निबंध-लेखन, वक्तृत्व-स्पर्धेसाठी तयारी ह्यांसारख्या गोष्टी विद्यार्थ्यांकडून करवून घेताना भाषाशिक्षक विचारांची शिस्त शिकवत असतो – म्हणजे निदान त्यांच्याकडून तशी अपेक्षा ठेवणे रास्त होईल. ही रास्त अपेक्षा माध्यमिक अध्यापक पुरी करू शकला नाही तर त्याचा विद्यार्थी विद्यापीठीय शिक्षणात चांगलाच कमी पडतो – मग शालेय किंवा विद्यापीठीय शिक्षणाचे माध्यम कोणतेही असो.

- अशोक रा॰ केळकर ('वैखरी', पृष्ठ ८१)






अनुक्रमणिका

# परभाषेंतील शब्दांची योजना

विष्णुशास्त्री चिपळूणकर

आपली मराठी भाषा सध्या बनत चालली आहे. वर्तमानपत्रें, सभा, मासिकें, पुस्तकें, ग्रंथ या सर्वांची अभिवृद्धी ही भाषावृद्धीची कारणें होत. यास्तव हीं हल्ली जारीनें चालू असल्यामुळें जसें झाड किंवा प्राण्याचें शरीर वाढतें, त्याप्रमाणें महाराष्ट्र भाषेची वाढ हल्ली सुरू आहे. इकडे इंग्रजी विद्येचा अलीकडे फैलावा होऊ लागल्यापासून नवे नवे विचार आपल्या भाषेंतील शब्दांनीं व्यक्त करण्याचें अगत्य पडूं लागलें आहे. तेव्हां या संधीस ही एक मोठ्या विचाराची गोष्ट आहे की, परकी भाषांतील शब्द आपल्या भाषेंत घ्यावे की नाहीत; व जर घ्यावे तर ते कोणत्या प्रमाणानें घेतले पाहिजेत वगैरे.

या विषयाच्या संबंधानें कित्येकांची अशी समजूत झालेली दृष्टीस पडते कीं परभाषांतले शब्द म्हणून मराठीत बिलकुल घेऊ नयेत. इंग्रजी, फारसी, आरबी वगैरे सर्व शब्द काढून टाकून निवळ मराठी शब्द योजीत जावे ही बुद्धि कशामुळें झाली आहे हे कोणासही सहज समजेलच. अलीकडे आमच्या राष्ट्रांत देशाभिमानाची थोडीशी झुळूक सुटली आहे. यामुळे जुने आचारविचार चांगले, इंग्रजी तऱ्हा बिलकुल उपयोगी नाही. स्वदेशी कापडच वापरायचे, परदेशी वस्तू घ्यायच्या नाहीत वगैरे लोकांचे ग्रह जसे हळूहळू होत चालले आहेत, त्याप्रमाणेंच परभाषेंतील शब्दांवर काही जणांचा मोठा कटाक्ष दृष्टीस पडतो. वस्तुतः पाहतां, ही स्वभाषेविषयीची पूज्यबुद्धि सर्वथा अप्रशस्त म्हणतां येत नाहीं. हें खरें कां की ही बुद्धि भाषादूषणावर अत्यंत मारक होय. ती हृदयात न वसल्यामुळें आजपर्यंत पुष्कळ ग्रंथकारांनी व वक्त्यांनी परकी भाषेच्या पायीं, आपल्या भाषेची विटंबना केली. मुंबईशाही मराठीचा प्रकार पाहिला किंवा वेदार्थयत्नांतल्या सारखा मासला पाहिला, तर वरील प्रकार किती हास्यास्पद व अनर्थकारक होय, हें तेव्हांच लक्षांत येईल. ड्रायडन् नामक प्रख्यात ग्रंथकाराने एके ठिकाणी म्हटले आहे – "जर परकी शब्दांची देशभाषेवर फारच गर्दी करून सोडली, तर मूळ भाषेस त्यापासून साह्य व्हावें तें न होता, त्यांचाच जसा काही मूळ शब्दांवर शिरजोरपणा दिसू लागतो."* परभाषेंतून वाजवीपेक्षां फाजील शब्द घेतले, म्हणजे येथें जसा इंग्रजांनीं प्रकार केला तसा होऊ लागतो हें उघड आहे. पण या प्रतिबंधास तरी काही मर्यादा अवश्य ठेवली पाहिजे. ती अशी की, जेथें मूळ भाषेंत शब्दच नाहीत, तेथें परभाषीय शब्दांस निमंत्रण करण्यास चिंता नाही. उदाहरणार्थ, छापखान्याचाच कारखाना

घ्या. यांतील परिभाषा, अर्थातच सारी इंग्रजी आहे. प्रूफ, स्टीक, प्रेसमन, पायका, प्रायमर, कंपाजिटर, करेक्टर वगैरे सर्व शब्द हे आगगाडीच्या किंवा तारायंत्राच्या परिभाषेप्रमाणे आमच्या भाषेंत रूढ झाल्यासारखेच आहेत.

आतां कोणी भाषाभिमानी पुरुषानें उठून प्रूफच्या जागी खर्डा, करेक्टरच्या जागीं शोधक असे जरी कांहीं शब्दांतर केले, तरी टैपांचे छप्पन्न प्रकार किंवा रेल्वे एंजिनांतील प्रत्येक भाग अथवा जहाजाच्या शंभर दोऱ्या इतक्यांस नांवें धुंडीत बसणें म्हणजे भगीरथ प्रयत्नच आहे. शिवाय हा प्रयत्न कितपत सिद्धीस जाईल याविषयीं आम्हांस शंकाच दिसते. संस्कृतांत पाहिलें तरी त्यांतही कित्येक शब्द परभाषेंतलेच येऊन मिसळलेले आहेत. विशेषतः ज्योतिषग्रंथांतील कित्येक पारिभाषिक शब्द ग्रीक भाषेंतून किंवा प्राचीन मिसरी भाषेंतून घेतल्यासारखे दिसतात. अर्वाचीन काळीं मोठ्या योग्यतेस चढलेली जी इंग्रजी भाषा, तींत तर हजारों शब्द परभाषांतूनच आलेले आहेत. हे तर काय? पण ज्या भाषेनें वरील भाषेंत कांहीं ना कांहीं तरी साहित्य केलें नाही, अशी बहुधा थोडकीच सांपडेल. यावरून काय समजावयाचें? इतकेंच कीं, परभाषांचा मिलाफ सर्व भाषांत व्हावयाचाच व तो झाला असतां त्यांत कांहीं मोठें अनिष्ट आहे असेंही नाहीं. इतकें मात्र व्हायाला पाहिजे कीं, जेथें जरूर नाही; तेथें वरील भेसळ होऊं देऊं नये व परभाषेच्या पायीं मूळ पद्धतीस म्हणजे वाक्यरचनेस वगैरे धक्का लागू देऊं नये.

त्यांतून आरबी व फारसी शब्द तर आमच्या भाषेला अगदीं खिळूनच गेले आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. लहानथोर, विद्वान-अविद्वान, बायका-पुरुष या सर्वांच्या तोंडीं जे शब्द आज पिढ्यानपिढ्या घट्ट बसले आहेत, ते आता कांहीं केल्या निघायाचे नाहींत, आणि ते निघून हल्ली निर्वाहही लागणार नाहीं. तेव्हां या संबंधें आग्रह धरला असतां तो केवळ मूर्खपणा होणार आहे. हे शब्द व महाराष्ट्रभाषा या दोहोंचा, जणों काय, एकजीवच होऊन गेला आहे; तो इतका कीं, त्यांचा परकेपणा अगदीं बुजून जाऊन, ते मूळचे यवनी म्हणून ओळखण्याचीसुद्धा पुष्कळ वेळां पंचाईत पडते. फार तर काय? पण एवढें सोंवळे जे महाराष्ट्रकवि, त्यांनीसुद्धा पुष्कळ ठिकाणी त्यांचा प्रयोग केलेला आढळण्यात येतो. तेव्हा आजपर्यंत जे जे आरबी व फारसी शब्द मराठी भाषेंत येऊन प्रविष्ट झाले आहेत, त्यांच्याविषयीं तर सध्या विचारच नाही. विचार करावयाचाच झाला तर नवीन शब्दांविषयीं; पण यांसही प्रसंगविशेषीं आव्हान करणें अवश्य होईल. जेथें इंग्रजी शब्दास मराठींत किंवा संस्कृतांत प्रतिशब्द आढळणार नाही, तेथें वरील दोन भाषांचीच प्रार्थना बहुधा करावी लागेल हे उघड आहे.

आतां, इंग्रेजी शब्दांविषयीं विचार केला, तर त्यांसही वरील गोष्टी पुष्कळ अंशीं लागू पडतील. 'खुर्ची' निवळ मराठी बनली आहे, तिजहून 'टेबल' कमी बनलें आहे असें नाहीं. अहमदनगर या विशेषनामास जशी मराठी भाषेंतून सनद मिळाली आहे त्याप्रमाणें 'मालकम् पेठे'सही मिळाली आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. हें तर काय? पण 'रांग', 'संत्री', 'पलटण', 'फरेट', 'कडाबीन', 'काडतूस' वगैरे शब्द तर इतक्यांतच आमच्याशीं लगट करून राहिले आहेत कीं जणों काय त्यांची व आमची आज कितीक दिवसांची गट्टी बनून गेली आहे! मोठ्या सोवळ्या आजीबाईलाही जसा आता बटाटा परका वाटेनासा झाला आहे, व तंबाखूची तर अलीकडे द्रोणागिरीच्यापर्यंत परंपरा लागत आली आहे, त्याप्रमाणेंच शेंकडों इंग्रजी शब्द अलीकडे आमच्या भाषेंतील शब्दांबरोबर खुशाल वावरूं लागले आहेत. देशाचा उदीम वाढण्याकरितां, ज्याप्रमाणें सर्व ठिकाणच्या व्यापाऱ्यांस व्यवहार करण्याची साऱ्या देशांत मोकळीक असतें, त्याप्रमाणें अर्थवाहक जे शब्द त्यांसही तशीच सर्वत्र सदर परवानगी असली पाहिजे. ती असली म्हणजे भाषेस शब्दप्राचुर्य, वैचित्र्य इत्यादी लाभच होणारे आहेत. इतकेंच मात्र की, ते शब्द भाषेवर शिरजोर होऊ देतां कामा नयेत, व त्यांच्या योगानें भाषेची शिस्त न बिघडेल अशी तजवीज ठेवली पाहिजे.

■

*ड्रायडनचे वरील वचन हें :- "If too many foreign words are poured in upon us, it looks as if they were designed, not to assist the natives, but to conquer them."

(शुद्धलेखन मूळ लेखनाप्रमाणे)

**विलंबाबद्दल क्षमायाचना**

काही अपरिहार्य परिस्थिती व कारणांमुळे 'भाषा आणि जीवन' ह्या त्रैमासिक पत्रिकेच्या प्रकाशनास गेला काही काळ विलंब होत आहे. परिस्थिती पूर्ववत होऊन अंक वेळेवर प्रसिद्ध होण्यास थोडा वेळ लागणार आहे. मराठी अभ्यास परिषदेचे सभासद, पत्रिकेचे वर्गणीदार व हितचिंतक ह्यांनी विलंबाबद्दल क्षमा करावी.

- संपादक





अनुक्रमणिका

.१.

# गावभाषा - आम्हां घरी धन!

केशव सखाराम देशमुख

**गा**वभाषा झाडांच्या खोलवर रुतलेल्या मूळांसारखी गावात, मानवी बोलींत बसलेली असते. समुद्रातील वाळूच्या अगणित कणांसारखी ही भाषा संपणारी नसली, तरी पिढ्यांच्या कालवशतेमूळे हातांतून निसटून जाऊ शकते. तेव्हा गावभाषेचे रक्षण हा विषय कळीचा बनायला हवा.

जून्या पिढीचे संस्कार आणि अनूकरणशील परंपरा यामूळे गावभाषा दीर्घ स्वरूपाचे बदल करीत नवी बनत नाही. महानगरी भाषा याउलट असते. माहितीज्ञानाच्या अतिवेगवान रूपांमूळे ही भाषा सत्वर बदलते. यासाठी मोबाईलच्या संदेशभाषेचे उदाहरणही पूरक, बोलके ठरावे अथवा विद्यापीठीय तरुणाईची त्यांची म्हणून एक भाषा आपल्या ऐकिवात आहे. गावभाषा म्हणूनच 'आम्हां घरी धन' या प्रकृतीची ठरते. गावभाषेचा पोत अस्सलच राहतो. तिच्यात फार भेसळ करता येत नाही. तशी भेसळ तिच्यात कुणी इसमगट करू लागला, तरी गावलोक ''तुम्ही कुठून आलात?'' असा प्रश्न विचारू शकतील.

मूद्रणाच्या लोखंडी खिळ्यांनी भाषा प्रथम जतन केली. ती सार्वत्रिक केली; ती प्रमाण केली. ही घटना सत्यार्थी असली तरी गावभाषेत जो पैस आणि तिच्यात वाहतेपण आहे ते प्रमाणभाषेत आढळत नाही हेही खरे आहे. अलीकडे मराठीचा साहित्यिक 'ग्रामीण' असं बिरूद घेऊन गावभाषा पचवत जोरदार लिहू लागला आहे. अशोक कौतिक कोळी यांची 'कुंधा' नावाची ठळक कादंबरी खानदेशमधल्या 'तावडी' या गावभाषेतच आकार घेते. इथली गावभाषेची लज्जत आणि या भाषेची संपूर्ण मिठ्ठास परिणामकारक ठरते. कोळींची भाषा बाजूला केली, तर त्या कादंबरीचं सत्त्व वजाबाकीत जाऊ शकतं.

व्यवहारधन झालेली आणि संवादलेणं बनलेली कुठलीही गावभाषा केवळ भाषिक सौंदर्य दृढ करीत नसते. गावाचं खानपान, गावाची रीत, गावाचे सणवार, गावाची सूख-दुःखं, गावाची परंपरा आणि गावाची जगण्याची सशक्त ढब या सर्व ऐवजांना आत्मसात करत गावभाषा झाडांच्या खोलवर रुतलेल्या मुळांसारखी गावात, मानवी बोलींत





अनुक्रमणिका

बसलेली असते. बारा कोसांवर भाषा बदलते, असं जे म्हटलं जातं, ते म्हणून अर्थवाचक आहे. उत्तरदक्षिण दिशांच्या एका रेषेमध्ये असणाऱ्या लातूर - नांदेड - हिंगोली या तीन जिल्ह्यांतली गावभाषा बघायची झाली, तरी त्या भाषेची रूपं कमालीची निराळी आणि स्वतंत्र ढब असणारी आहेत. ''आपण काय करीत आहात?'' हे वाक्य गावभाषेच्या परिसस्पर्शानं लयदार, घाटदार, चवदार होताना दिसते. वर निर्देश केलेलं वाक्य लातूरच्या भूमीत ''काय करू लालाव,'' नांदेडच्या गावभूमीत ''काय करायल्या'' आणि हिंगोली परिसरातील गावभाषेत तेच वाक्य ''काय करायलास'' असं रूप घेऊन येताना दिसते. गावभाषेचा अंतरंगढंग हा खास प्रदेश, माती, माणूस यांच्या पारंपरिक रीतीभातींनी अधिक प्रत्ययकारी झालेला आढळतो. एवढी अवाढव्य पुस्तकक्रांती झाली असली, तरी अथवा ग्रामग्रंथालयांच्या बऱ्यापैकी वाढत्या सोयी खेड्यांच्या भोवती वाढत असल्या तरीही वडाच्या झाडांखाली, देवाच्या पारावर बसलेल्या गावमाणसांच्या गावभाषेला धक्का लागलेला नाही. याचे कारण खोलच खोल मूरून असलेल्या ग्रामभाषा परंपरेतच आहे. ही भाषा परंपरा शेण आणि माती, त्वचा आणि मांस अशा पद्धतीची आहे. मूलतः भांडणतंटा घडताना गावभाषा शस्त्राचा अवतार बनून कार्य करताना दिसते. उत्स्फूर्तता हा गुण गावभाषेत जानप्राण ओततो. याउलट अचानक व्यक्त होतानाही माणसं ही मूळ पदावर; तात्पर्य मूळ भाषेवर येतात. रागाचं रूप मूळ भाषेत अधिक तीव्र होताना दिसते. गावभाषेत या भाषाबोलींचा प्रत्ययकारी अनुभव हा अधिकच येतो हे खरे. 'भाषाबंदी' नावाची एक कल्पना भाषेत असते. श्लीलता लक्षात घेऊन काही शब्द, वाक्य, विचार, रूपं समाजात वापरू नयेत; यासाठी भाषाबंदी! संस्कृतीच्या चांगलेपणातून रूढ होत गेलेली समाजसंवर्धक अशी ही कल्पना. पण पुष्कळदा गावभाषेत प्रेमभावनेतून सहज शिवी उपयोगात आणली जाते. अशा वेळी तंटा उद्‌भवत नाही; पण हीच भाषाबंदीची रूपं एका अनोळख्याकडून दुसऱ्या अनोळख्याकडे वापरली, की झगडा व्हायची शक्यता असते. म्हणजेच गावभाषा उपयोगाचे काहीएक ग्रामनियम असतात. जे लिखित नाहीत, जे परंपरेच्या धारांमधून परंपरेत प्रवाही बनून आहेत.

या गावभाषेसंबंधी असा एक मुद्दा समजून घेता येईल आणि तो म्हणजे गावातील जुन्या वयस्क महिलांची गीतात्म भाषा; तसेच वयस्क आणि गावांना मार्गदर्शन करत असणाऱ्या पुरुषांची भाषा. या दोन घटकांकडूनच गावभाषेचं पोषण आणि गावभाषेचं रक्षण होताना प्रामुख्यानं आढळतं. 'आम्हां घरचं हे धन' जतन करण्याकरिता गावातील उच्चशिक्षितांनी आधुनिक जतनप्रवण साधनांचा वापर करून ही वयोवृद्धांची जबरदस्त गावभाषा सांभाळण्याचा यत्न करायला हवा. समुद्रातल्या वाळूच्या अगणित कणांसारखी ही भाषा संपणारी नसली, तरी पिढींच्या कालवशतेमुळे हातांतून निसटून जाऊ शकते. गावभाषारक्षणाचा विषय कळीचा बनायला हवा.

गावभाषासंशोधनातील दुसरीही एक महत्त्वाची बाजू आहे आणि ती आहे, या भाषेसोबत कृषक परंपरा जतन होण्याची. कृषक परंपरा आणि गावभाषा असा मेळ आहे. वस्तूंचा नामकोश आणि कार्यकोश ही मोठी क्षेत्रं आहेत. गावभाषा आणि गावशेती या अशा विस्तारशील विषयांत अभ्यासकांनी उडी घेतली, तर आंतरविद्याशाखेसाठी मदतच होईल. भाषा, वाङ्मय, इतिहास, समाज, संस्कृती आणि इतर सामाजिक शास्त्रांकरिता नवा अभ्यास या गावभाषासंशोधनातून निश्‍चितच होईल. कृषिनिष्ठा आणि भाषासमृद्धी याकडे दुर्लक्ष वाढत गेले, तर गावभाषा अडचणीत येण्याची शक्यता पुढल्या काळात डोकं वर काढू शकेल. 'बैल आणि औत' हे दोन मोठे विषय शेतीतून बाद होण्याचे भय आहे. कारण मालकी व भाडेतत्त्वांवर यंत्रशेतीचा वावर वाढू पाहत आहे. मग बैल व औत यांच्याभोवती मोठा अर्थ आणि भाषा आहे; ती कालवश होण्याची भीती आहे. गावभाषेला ही बसणारी झळ भाषिक, सांस्कृतिक जबर हानी करणारीच आहे.

(दै० सकाळ, दि० २५ जुलै २०१५)

.२.

## बोली भाषांच्या संवर्धनासाठी...

इरगोंडा पाटील

**भा**षेचा जन्म बोलण्यासाठी झालेला असल्याने त्याचे मूळ स्वरूप हे बोली असेच असते. त्यामुळे सर्वच भाषा या प्रथम बोली आहेत. भाषा ही भाषाच असते, ती शुद्ध अगर अशुद्ध असत नाही. तरीही भाषेच्या प्रमाणीकरणाची गरज शिक्षण आणि व्यवहारासाठी आवश्यक असते. जगभर ज्ञानाचा व्यवहार करणारा एक अभिजात वर्ग आहे. हा संख्येने कमी असला तरी सत्ताधारी असतो. त्यामुळे ज्ञानाचा व्यवहार करणाऱ्या अभिजनांची बोली हीच त्यांनी प्रमाण भाषा बनवली. त्याच भाषेची जी विविध रूपे असतात, त्यांना ज्ञानाच्या व्यवहाराची भाषा म्हणून स्थान मिळाले नाही. या सर्व बहुजनांच्या बोली आहेत.

मराठीतील प्रमाण भाषा ही अभिजनांची बोली आहे. तीच आज शिष्ट भाषा म्हणून शिक्षणाची भाषा म्हणून मान्य आहे. मराठीच्या विविध बोली या मराठीची विविध रूपे आहेत. बहुजन दैनंदिन व्यवहार याच बोलीतून करतो. माहिती तंत्रज्ञानाच्या क्रांतीमुळे जगभरच्या बोली भाषा मृत्युपंथाला लागतील, असे भाषावैज्ञानिक सांगत आहेत. या बोली भाषांच्या संवर्धनासाठी 'युनेस्को'ने योजना तयार केली आहे. केंद्र सरकारने काही उपाययोजना केल्या आहेत. या मलमपट्ट्या आहेत. प्रत्येक भाषेच्या अस्तित्वासाठी तिला प्रथम शिक्षणाची आणि राज्यकारभाराची भाषा बनावी लागते. प्रत्येक भाषेत ही

क्षमता असते. त्यासाठी भाषेचा विकास करावा लागतो. भाषेची समृद्धी ही तिच्या शब्दसंपत्तीवर अवलंबून असते. मराठीने अनेक परकी भाषांतून शब्दसंपत्ती घेतली आहे. त्याच वेळी आपल्याच भाषेची वेगवेगळी रूपे असलेल्या बोलीतून शब्द आला, की त्याला अशुद्ध रूप ठरविले आहे.

मराठीचा विकास करण्यासाठी प्रथम प्रमाण भाषेकडे पाहण्याचा दृष्टिकोन बदलावा लागेल, त्यासाठी आज जे 'बोली भाषेकडून प्रमाण भाषेकडे' असे ठोकून घोळून घेतले जात आहे, यातून मराठीचे संवर्धन होणार नाही. मराठी संकुचित बनण्याचाही मोठा धोका आहे.

प्रमाण भाषा ही अभिजनांचीच भाषा न बनता ती बहुजनांच्या बोलीतील शब्द स्वीकारून भाषेचे प्रमाणीकरण केले पाहिजे. ज्ञानाच्या व्यवहारासाठी प्रमाणीकरणाची गरज असते. ही प्रक्रिया मराठीत झाली नाही. बोलीतून ललित साहित्याची निर्मिती झाली. कारण कलाकाराला उत्स्फूर्त कलाविष्कारासाठी त्याखेरीज पर्याय असत नाही. कलाकार हा बंडखोर असतो. त्यामुळेच रवींद्रनाथ टागोरांना व्याकरणाचे नियम ठाऊक नाहीत, असे विद्वान म्हणू लागले, तेव्हा टागोरांनी सांगितले, 'लोक जसे बोलतात तसे मी लिहितो' आपल्या संतांनीही हेच केले. त्यामुळे संतांचे साहित्य निरक्षरांनाही मुखोद्गत असते. कारण लोकांच्या जगण्याची भाषा त्यांनी वापरली. मराठी भाषा, तिच्या विविध बोली भाषा आणि आदिवासी भाषेच्या संवर्धनासाठी काही उपाय सुचविले गेले आहेत. एक तर शिक्षणाची भाषा म्हणून ज्ञान भाषा म्हणून स्थान मिळाल्याखेरीज कोणत्याही भाषेचे संवर्धन होणार नाही. एकतर 'बोलीकडून प्रमाण भाषेकडे' हा प्रचार आहे, तो तातडीने थांबवावा लागेल. यातून बोली मारल्या जाणार आहेत. बोली याही भाषाच आहेत, त्यांना जिवंत ठेवायचे आहे.

भाषेच्या विकासासाठी शासकीय पातळीवर काही प्रयत्न सुरू आहेत. जनतेतील जागृती हीही महत्त्वाची आहे. आदिवासींच्या ज्या बोली आहेत, त्या मराठीच्या रूपाप्रमाणे नाहीत, तरी मराठीचे तिच्यावर काही संस्कार आहेत. कोरकूसारख्या बोलीत फारच कमी शब्दसंख्या आहे. आपल्या आविष्कारासाठी त्यांना कमी शब्दांचीच गरज वाटते. आदिवासी मुलांना आदिवासी बोलीतूनच शिक्षण द्यावे, असा विचार मांडणारे काही आहेत. त्यामुळे आपण मागे पडू ही भीती आदिवासींनाही वाटते. त्यामुळे आदिवासीतून शिक्षणाला आदिवासींमधीलच काहींचा विरोध आहे. मराठीच्या जवळजवळ पन्नास बोली भाषा आहेत. त्यात प्रादेशिक छटाही आहेत. त्यामुळे या वेगवेगळ्या प्रादेशिक छटांकडे भाषेचे सौंदर्य म्हणूनच पाहिले पाहिजे. कारण त्यात नैसर्गिकता आहे.

काही महत्त्वाच्या बोली आणि आदिवासी बोलीच्या संवर्धनासाठी, या भाषांना ज्ञानाच्या व्यवहाराची भाषा बनविण्यासाठी या भाषांचे अभ्यासक्रम विद्यापीठांना विकसित करता येतील. केवळ त्या बोलीतील त्याच भाषेतून शिक्षण घ्यावे, यातून त्यांच्यात भाषिक न्यूनगंड निर्माण होऊ शकतो. यामुळे आपण मुख्य प्रवाहापासून दूर राहू ही भीती वाटू शकते. तसे घडलेही आहे. या बोलींचा प्रसार हा व्यापक रीतीने झाल्यास त्यांना प्रतिष्ठा मिळेल. आता शिक्षण लवचिक झाले आहे. वेगवेगळ्या भाषा शिकण्याकडे कल वाढत आहे. यामागे व्यावहारिक हेतू असला, तरी आवड आणि छंद म्हणूनही भाषा शिकणारा मोठा वर्ग आहे. इंग्रजीमुळे मराठी भाषा धोक्यात आली आहे, हा विचार सोडून मराठीतून सर्व ज्ञानशाखांतून अभ्यासक्रम विकसित करून, त्यातून कौशल्य प्राप्त केले पाहिजे. आपण आधुनिक कौशल्य प्राप्त केले आहे काय हा मूलभूत प्रश्न आहे. त्यासाठी कोणत्याही भाषेची क्षमता ही विज्ञान-तंत्रज्ञानाची भाषा बनण्याची असते. त्यासाठी भाषा लवचिक असावी लागते. आपल्या भाषेत सामावून घेण्यासाठी मानसिकताही ठेवली पाहिजे. आपल्या भाषेत तो शब्द येताना जसाच्या तसा आला पाहिजे, असे नाही, तर आपल्या भाषेच्या प्रकृतीप्रमाणे तो आला पाहिजे. 'मँचेस्टर कॉटन' हा शब्द आपल्या ग्रामीण जनतेने 'मांजरपाट' असा करूनच भाषिक व्यवहारात सामावून घेतला.

मराठी ही जगातील एक प्रमुख भाषा आहे. तिच्या उज्ज्वल भवितव्यासाठी तिला ज्ञान-विज्ञानाची भाषा बनवताना,बोलींनाही जिवंत ठेवण्यासाठी त्यांच्या विकासाचा कार्यक्रमही आखला पाहिजे. 'बोलीकडून प्रमाण भाषेकडे' या दृष्टिकोनामुळे बोली नष्ट होणार आहे. तेव्हा बोली नष्ट न करता मराठी समृद्ध बनली पाहिजे.

(दै० सकाळ, पुणे । शनिवार, दि० २३ मे, २०१५)

.३.

# शिक्षण, साहित्य आणि समाज

**- संदीप वासलेकर**

**सु**मारे पावणेदोनशे वर्षांपूर्वी लॉर्ड मेकॉले व ख्रिस्ती धर्मगुरू यांनी भारतात इंग्लिश भाषेतलं शिक्षण, इंग्लिश आचार-विचार व इंग्लिश वैचारिक बैठकीचा प्रसार करण्यासाठी प्रयत्न केले, हे सर्वश्रुत आहे. त्याच दरम्यान एक व्यक्ती मराठी व गुजराती या भाषांमध्ये शिक्षण देण्यासाठी खूप प्रयत्न करत होती. त्या व्यक्तीच्या प्रयत्नांमुळं




अनुक्रमणिका

मुंबई-पुण्यात मराठी शाळा आल्या. अर्थात पेशव्यांच्या काळात २२२ मराठी शाळा पुण्यात होत्या; परंतु त्या घरगुती स्वरूपाच्या होत्या. त्यानंतर आधुनिक पद्धतीच्या शाळा खास मराठीत उघडण्यासाठी त्या व्यक्तीनं सर्वकाही पणाला लावलं. त्या व्यक्तीचं नाव होतं माउंटस्टुअर्ट एल्फिन्स्टन. ते ब्रिटिश सरकारनं नेमलेले मुंबई प्रांताचे पहिले राज्यपाल होते.

लॉर्ड मेकॉले व ख्रिस्ती धर्मगुरू यांच्या प्रखर विरोधात एका ब्रिटिश राज्यकर्त्यानं मराठी भाषेतल्या शिक्षणाचा पाया रचला. आता मेकॉले यांच्या आधुनिक अनुयायांना खूष करण्यासाठी स्वतंत्र भारतातल्या सरकारांनी मराठी शाळांची अशी जोपासना केली आहे, की त्या आपोआप बंद होतात अथवा अतिशय वाईट परिस्थितीत जगतात! लॉर्ड एल्फिन्स्टन यांनी पुढाकार घेतल्यानंतर मुंबईत जगन्नाथ शंकरशेट, पुण्यात महात्मा जोतिराव फुले आदी मंडळींनी शिक्षणाच्या प्रसारासाठी आटोकाट प्रयत्न केले. त्या वेळी भारत स्वतंत्र होण्याची शक्यता नव्हती. स्वातंत्र्य मिळायला पुढं १००-१२५ वर्षं लागली; परंतु देश, समाज व मनबांधणीचं काम अतिशय दूरदृष्टी ठेवून या महान व्यक्तीनं केलं.

आपल्या सध्याच्या समाजात १००-१२५ वर्षं पुढचा विचार करणारे किती विचारवंत व सामाजिक कार्यकर्ते आहेत?

मला अनेक लोक उपहासानं विचारतात : ''तुम्ही 'सकाळ'मध्ये का लिहिता? इंग्लिश वर्तमानपत्रात का लिहीत नाही? तुमच्या 'एका दिशेचा शोध' या मराठी पुस्तकाची इंग्लिश आवृत्ती का येत नाही?''

एकदा तर 'सकाळ'च्या वेबसाईटवर एका वाचकानं जाहीर प्रतिक्रिया लिहिली होती : ''संदीप वासलेकर नावाची कुणी व्यक्ती अस्तित्वातच नाही. जर खरंच कुणी आंतरराष्ट्रीय पातळीवर कार्य करणारं असं कुणी असतं, तर आपण त्यांना इंग्लिश वर्तमानपत्रांत अथवा चॅनलवर पाहिलं असतं.''

मी अगदी जाहीरपणे सांगतो, की 'एका दिशेचा शोध' या पुस्तकाची हिंदू व उर्दू भाषांतरं प्रसिद्ध झाली आहेत; पण मला इंग्लिश भाषांतरात बिलकूल रस नाही. माझा काही हजार युवकांशी संबंध आला आहे. महाराष्ट्रात अत्यंत प्रगल्भ विचारशक्ती असलेले लाखो युवक आहेत, याची मला खात्री आहे. त्यांना देशाविषयी तळमळ आहे; परंतु त्यांची पत्रं वाचल्यावर हे स्पष्ट दिसतं, की त्यांना उच्च दर्जाचे इंग्लिश येत नाही. भाषा हे केवळ माध्यम झालं. त्यांची वैचारिक क्षमता विकसित करायची असेल, तर त्यांना मराठीतून ज्ञान व विश्लेषण मिळालं पाहिजे. इंटरनेटवर जाऊन त्यांना माहिती





अनुक्रमणिका

मिळेल; पण आंतर्दृष्टी मिळणार नाही. मी १२५ वर्षांच्या पुढचा विचार करत नाही; परंतु किमान २५ वर्षं पुढं विचार करून तरी त्यांची वैचारिक शक्ती भक्कम करण्यासाठी आपण सर्वांनी प्रयत्न केले पाहिजेत.

अर्थात या युवकांनी इंग्लिश, फ्रेंच, चिनी भाषांवर प्रभुत्व मिळवण्यासाठी प्रयत्न केलेच पाहिजेत. आधुनिक जगात मातृभाषेचा दुरभिमान परवडणार नाही. एकाच वेळी मराठीतून ज्ञान व आंतर्दृष्टी विकसित करायची व त्याच वेळी आंतरराष्ट्रीय भाषांवर प्रभुत्व मिळवण्यासाठी अहोरात्र प्रयत्न करायचे, असं दुहेरी धोरण वापरून आयुष्याचा प्रवास करायचा, हा मंत्र जे युवक वाचक वापरतील, ते येत्या २५ वर्षांत जगभर चमकतील. जर असं करण्यात लाखो युवकांना यश मिळालं, तर महाराष्ट्र संपूर्ण जगात अग्रेसर होईल. हे करायचं असेल तर मराठी शाळा, मराठीतून जागतिक साहित्य यांचा प्रसार आणि आंतरराष्ट्रीय भाषांमध्ये तरबेज करण्यासाठी प्रशिक्षणाची कामं यांत राज्य सरकारनं खूप मोठी गुंतवणूक करणं गरजेचं आहे.

फ्रान्स, जर्मनी, जपान, चीन, कोरिया या देशांत असं दुहेरी धोरण अवलंबलं जातं. मुला-मुलींना मातृभाषेत शिक्षण देऊन विचारप्रक्रिया व आंतर्दृष्टी विकसित करण्यासाठी प्रोत्साहन द्यायचं व जागतिक ज्ञानसंपादन करण्यासाठी आंतरराष्ट्रीय भाषा शिकण्याची सोय करून द्यायची, हे ते धोरण. त्यामुळं आज हे देश सर्व निर्देशांकांत जगात पुढं आहेत.

पुढच्या २५ वर्षांतला समाज घडवण्यासाठी केवळ सरकारी प्रयत्नांवर अवलंबून राहून काही होणार नाही. शिक्षक, साहित्यिक व धनाढ्य मंडळींनी एकत्र येऊन सुसूत्रपणे प्रयत्न करण्याची आवश्यकता आहे. मराठी भाषेतल्या शिक्षकांना समाजात मानाचं स्थान असायला हवं; त्यासाठी त्यांनी इंटरनेटवर जाऊन साहित्य व शास्त्रांची माहिती, त्यांचं भाषांतर व त्यावर मराठीभाषक विद्यार्थ्यांसाठी विश्लेषण देण्याचा धडाका सुरू केला, तर आपोआप त्यांची वाहवा होईल. मराठी साहित्यिकांनी ग्लोबल व लोकल असे दोन्ही पैलू लक्षात घेऊन साहित्याची निर्मिती केली, तर खूप मोठा युवावर्ग त्यांच्या साहित्याची वाट पाहात आहे, हे लक्षात येईल.

या मार्गानं जाण्यात श्रीमंत व्यक्तींची मोठी जबाबदारी आहे. जगन्नाथ शंकरशेट यांनी मुलींची शाळा काढण्यासाठी स्वतःची इमारत दान केली होती. हे त्यांना १८९० च्या दरम्यान सुचलं, त्याच वेळी मुंबईच्या कामा कुटुंबानं 'सुमित्र' हे मराठी भाषेतलं, तर 'स्त्रीबोध' हे गुजराती भाषेतलं नियतकालिक सुरू करण्यासाठी संपूर्ण आर्थिक साह्य पुरवलं. २०१६ च्या महाराष्ट्रात श्रीमंत मंडळी खूप आहेत. मराठी साहित्य फुलवण्यासाठी त्यापैकी किती जण पुढं येतील?





अनुक्रमणिका

साहित्याप्रमाणे विज्ञानाची प्रगती करण्यासाठीदेखील समाजातल्या सबळ घटकांची गरज आहे. शंभर वर्षांपूर्वी स्वामी विवेकानंद यांनी विज्ञान संशोधन संस्था उभारण्याची कल्पना मांडली. त्यांना टाटा व वाडियार कुटुंबीयांनी संपूर्ण मदत दिली व स्वामी विवेकानंद, टाटा आणि वाडियार यांपैकी कुणाचंही नाव संस्थेला देण्यात आलं नाही अथवा कुणाचाही पुत्र संस्थेचा संचालक झाला नाही. सध्या भारताला सौरऊर्जा, जैविक शास्त्र, कृत्रिम बुद्धिमत्ता, आभासी वास्तव अशा अनेक आधुनिक विषयांत मूलभूत संशोधन करण्याची गरज आहे; पण कोणत्याही उद्योगपतीला त्यासाठी खर्च करण्याची इच्छा दिसत नाही. क्रिकेटचे चमू घेण्यासाठी सगळ्यांकडे भरपूर पैसे आहेत.

जे २०० व १०० वर्षांपूर्वी सहजतेनं जमलं, ते सध्या का जमत नाही? आपण राजकारण, राष्ट्रकारण, समाजकारण व स्वार्थ यांतला फरक विसरलो आहोत. मला दिल्लीतले विचारवंत पाहिल्यावर खूप वाईट वाटतं. ते तीन प्रकारांत मोडतात. एक प्रकार म्हणजे सनदी अधिकारी. आपण खूप मोठे विचारवंत आहोत व आपल्यालाच सर्व काही समजतं असं त्यांना वाटतं. दुसरा प्रकार म्हणजे निवृत्त सनदी अधिकारी आणि तिसरा प्रकार म्हणजे आशाळभूत सनदी अधिकारी; म्हणजे ज्यांची सनदी अधिकारी व्हायची इच्छा होती; पण आयएएस परीक्षा नापास झाल्यामुळं काहीही करून सरकारी 'बाबूवर्तुळा'त आपला स्वीकार व्हावा म्हणून कायम मग्न असतात अशा व्यक्ती!

ज्याप्रमाणे राज्य सरकारनं युवकांची विचारशक्ती, ज्ञान व बौद्धिक क्षमता वाढवण्यासाठी सुविधा आणि सोई पुरवण्याची गरज आहे; तसंच विचारवंतांनीसुद्धा सरकारी पद, पैसा व पदक यांच्याकडं दुर्लक्ष करून प्रतिभासंपन्न साहित्य, शैक्षणिक उपक्रम व संस्थांची उभारणी करण्याची गरज आहे. असं झालं तरच उद्याचा देश घडेल.

(दै॰ सकाळ, पुणे । रविवार, दि॰ १७ जानेवारी, २०१६)







अनुक्रमणिका

# डिंगोऱ्यातील ४१ विद्यार्थी इंग्रजीकडून मायबोलीकडे!

संजय डुंबरे

आम्ही पालकांसमोर मराठी माध्यमातल्या मुलांची आणि त्यांच्याच शेजारी राहणाऱ्या इंग्रजी माध्यमातल्या मुलांची तुलना करून, इंग्रजी माध्यमातल्या त्यांच्या मुलांचं अज्ञान दाखवून दिलं. जवळ जवळ ६० टक्के मुलांना abcd लिहिता येत नव्हतं, ही मुले मराठी शाळेत शिकणाऱ्या मुलांच्या तुलनेत अप्रगत होती. मराठी माध्यमाच्या मुलांचं मराठी आणि इंग्रजीचं भाषिक कौशल्य, इंग्रजी माध्यमाच्या मुलांच्या तुलनेत सरस होतं, ह्या सर्व गोष्टी आम्ही सिद्ध करून दाखवल्या.

वर्षभर चार-पाच वेळा पालकांच्या सर्वच शिक्षकांनी भेटी गाठी घेतल्या. बहुतांशी पालक शेतकरी, वाहन चालक असे होते. महिला वर्गाचे मन वळवण्यासाठी विशेष कष्ट घ्यावे लागले. शाळेतल्या शिक्षिकांनी अशा महिलांची भेट घेऊन मराठी शाळांचे फायदे प्रभावीपणे मांडले. आमच्या शाळेतल्या शिक्षकांची मुले आमच्याच शाळेत आहेत आणि या गोष्टीचा पालकांचे मन वळवण्यासाठी खूप मोठा फायदा झाला, पालकांशी सतत संपर्क ठेवला.

शाळेतील उपक्रमांची प्रभावीपणे मांडणी केली. पालकांना खासकरून शाळेत चालवल्या जाणाऱ्या योगासनांच्या उपक्रमाबद्दल माहिती देऊन त्याची मुलांच्या सर्वांगीण विकासात कशी मदत होऊ शकते, स्मरण शक्ती वाढण्यासाठी कशी मदत होऊ शकते हे प्रभावीपणे मांडले. आमच्या जि०प० शाळेची २५ मुले शीर्षासन, मयुरासन, बकासन, अशी साधारण २०-२५ आसने अगदी सहज करतात. अक्षर लेखनात मुलांनी प्रावीण्य मिळवले असून, ह्या मुलांचे अक्षर मोठ्या माणसांपेक्षा देखील सुंदर आहे. अशा उपक्रमांचा व्यक्तिमत्त्व-विकासासाठी खूपच उपयोग होतो. आमची सर्व मुलं फलक लेखन करतात. ह्यात ते इंग्रजी तसेच मराठी भाषेतून देखील चांगल्या प्रकारे लिहितात. फलक लेखन झाल्यावर त्याचे वाचन करतात, मुलांना सुमारे ५० मराठी-इंग्रजी गाणी पाठ आहेत, ती कथाकथनही करतात.

आमच्या भागातल्या इंग्रजी शाळांमध्ये केवळ मुख्याध्यापक कॉन्व्हेंटमध्ये शिक्षण घेतलेले आहेत, आणि एखादाच शिक्षक कॉन्व्हेंटमध्ये शिकलेला असतो. सहशिक्षकांना २५०० ते ३००० रुपये पगारावर ठेवले जाते. कमी पगारामुळे हे शिक्षक

जिथे जास्त पगार मिळेल तिकडे जाण्याचा प्रयत्न करत असतात. शिक्षिकांचे लग्न झाले की त्या त्यांच्या पतीच्या गावी निघून जातात, परिणामी अशा शाळांमध्ये एकाच वर्षात मुलांना शिकवायला चार-पाच वेगवेगळे शिक्षक येतात, त्यामुळे गुरु-शिष्य हा बंध तयार होतच नाही आणि मुलांना देखील दर २ महिन्यांनी नवीन शिक्षकांशी जुळवून घेणे कठीण जाते. इंग्रजी शाळांचे फक्त ग्लॅमर पाहून घ्यावे! चकाचक बूट, कपडे...

इंग्रजी शाळांमधली मुले प्रवासामुळे अक्षरशः थकून जायची, त्यांचे सकाळचे दोन तास आणि संध्याकाळचे दोन तास प्रवासातच जायचे. आमच्या मराठी शाळेने लक्षात घेतले की गावाच्या आजूबाजूला २० किलोमीटर अंतरावरून ही मुले इंग्रजी माध्यमाच्या शाळेत येतात. आता आम्ही इथे शक्कल लढवली. एक स्कूल बस ठेवली, प्रत्येक पाच किलोमीटर परिघात एक फेरी अशा साधारण एका तासात चार फेऱ्या होतात. पालकांनी २५०० रुपये प्रत्येकी गोळा करून, ह्या स्कूल बसचा खर्च उचलला. एक लाख रुपये जमवून, दर महिन्याला १० हजार रुपये वाहनचालकाला दिले जातात. आता मुलांचे हाल होत नाहीत. प्रवासासाठी मुलांची सकाळची १५-२० मिनिटे आणि संध्याकाळची १५-२० मिनिटे एवढीच खर्च होतात. आम्ही शिक्षकदेखील आळीपाळीने ह्या स्कूल बसमध्ये मुलांबरोबर प्रवास करतो, जेणेकरून आमचे मुलांवर लक्ष राहते.

आमची गेल्या वर्षीची पटसंख्या १२५ इतकी होती आणि ह्या वर्षी ती साधारणतः १५०पर्यंत जाईल. पालकांना त्यांच्या मुलांचे इंग्रजी माध्यमामुळे झालेले नुकसान पुढील सहा महिन्यांत भरून काढू, त्यांच्यासाठी खास उपक्रम राबवू, अशी आम्ही हमी दिलेली आहे. लगेच ही मुले आमच्याकडे येऊन हुषार होतील असे नाही पण ती किमान पातळीपर्यंत येतील असे आम्ही पाहणार आहोत.

आमच्याकडे असलेले शैक्षणिक साहित्य, तसेच १५ संगणक, नवीन इमारत, ई-लर्निंगचे दोन संच अशा सर्व गोष्टींची मदत होईल ह्याची आम्हांला खात्री आहे.

आमच्याकडील सर्व मुले स्वतः कोणाच्याही मदतीशिवाय संगणक चालवतात. त्यामुळे ते इंग्रजी शब्दांचा संग्रह करू शकतात, संगणकावर चित्र काढू शकतात, संगणकावरच्या गेम्स खेळू शकतात, संगणकाचे प्राथमिक ज्ञान अतिशय चांगल्या पद्धतीने सर्व मुलांना दिलेले आहे. त्यांना आजपर्यंत संगणकासाठी फक्त आम्ही शिक्षकच मार्गदर्शन करत होतो पण आता आम्ही गावातल्याच एका माजी विद्यार्थिनीची संगणक शिक्षिका म्हणून नेमणूक करणार आहोत. ही मुलगी MS-CITचे वर्ग घेते. अतिशय थोड्याश्या मानधनावर तिने ह्या मुलांना मार्गदर्शन करण्याची तयारी दर्शवली आहे. दिवाळीनंतर साधारण २५ मुलं MS-CITच्या परीक्षेला देखील बसतील.





अनुक्रमणिका

आमच्या मराठी शाळेने लेझीम स्पर्धांमध्ये लक्षणीय यश मिळवलेले आहे. जिल्हा पातळीवर लेझीम स्पर्धेत आमच्या शाळेने मागील वर्षी दुसरा क्रमांक मिळवलेला आहे. क्रीडास्पर्धांमध्ये तसेच सांस्कृतिक स्पर्धांमध्ये, शाळेने लक्षणीय यश मिळवलेले आहे. सकाळ बालकुमार चित्रकला स्पर्धांमध्ये शाळेतल्या २ मुलींचा नंबर लागला होता. पुणे जिल्हा परिषदे तर्फे WE LEARN ENGLISH हा कार्यक्रम रोज सकाळी ११ वाजता रेडियोवर प्रसारित केला जातो, त्यामध्ये शिक्षण अधिकारी प्रश्न विचारतात आणि जी मुले मोबाईलवरून सर्वात अगोदर उत्तर देतील त्यांना विजयी घोषित केले जाते. योगायोगाने आमच्या शाळेतल्या शिवानी मांडलिक या मुलीचा नंबर लागला आणि तिने तात्काळ उत्तर देऊन बक्षीस पटकावले.

आमच्या शाळेमध्ये सर्व सण मग गुढीपाडवा असो, रंगपंचमी असो, ईद असो, किंवा दिवाळी असो, अगदी आनंदाने साजरे केले जातात. दीपावलीच्या वेळेस सर्व शिक्षक आणि विद्यार्थी एकत्र फराळाचा कार्यक्रम असतो. भारतरत्न बाबासाहेब आंबेडकर जयंतीच्या दिवशी आम्ही मिरवणूक काढून खास कार्यक्रम साजरे करतो, त्याद्वारे सर्व जातीच्या आणि धर्मांच्या प्रती एकोप्याची भावना तयार होण्यास मदत मिळते. आमचे सर्वात प्रथम उद्दिष्ट आहे ते म्हणजे या देशाला उद्याचे उत्कृष्ट नागरिक देणे.

आत्ताच आम्हांला एका सेवाभावी संस्थेने १५० दप्तरे दिली, वॉटर फिल्टर दिला, जिल्हा परिषदेकडून सौर संगणक कक्ष भेट मिळालेला आहे. येत्या काही दिवसात सौर यंत्रणा बसवायची आहे. लवकरच आमच्या शाळेला ISO दर्जा मिळेल परंतु आमच्या शाळेला अजून कुंपण नाही म्हणून तो दर्जा रखडलेला आहे, परंतु येत्या काही दिवसांत हे काम पूर्ण करून कुंपण बसवून घेण्यात येईल. आमची शाळा तालुक्यामध्ये पहिल्या पाच शाळांमध्ये गणली जाते. मागील वर्षी मला आदर्श शिक्षक पुरस्कार देखील मिळाला! शाळेच्या प्रगतीसाठी आमचे कार्य अविरतपणे चालू आहे.

गेली १४ वर्षे मी एका वंचितांच्या शाळेमध्ये होतो. ठाकर आणि वैदू समाजाची मुले तिथे मोठ्या प्रमाणात होती. बल्लाळवाडी, पांगरी, ओतूर ह्या ठिकाणी शाळा आहे. तिथली पटसंख्या देखील १०० होती ती आम्ही अनेक उपक्रम राबवून १७५वर नेली. तिथेतर वेगळीच परिस्थिती होती. वैदू समाजाची ४० मुले रोज सकाळी भिक्षा मागण्यासाठी जुन्नरला जायची, ओतूरला जायची. मग तिथून शाळेत आल्यानंतर आम्ही त्यांना कपडे घालायचो, शाळेत आंघोळ घातली जायची, त्यांच्यासाठी केस कापणे, नखे कापणे हे कार्यक्रमदेखील आम्ही राबवायचो. हे एकट्या-दुकट्याचे काम नाही, केवळ शिक्षकांनी दिलेल्या साथीमुळे हे शक्य झाले.





अनुक्रमणिका

आमच्या दृष्टीने शाळा टिकवणे हे तर उद्दिष्ट आहेच परंतु शिक्षक टिकवणे हेदेखील मोठे आव्हान आहे. गेल्या वर्षी आमच्या तालुक्यात २९ शिक्षक अतिरिक्त झाले होते. त्यांतील १३ शिक्षक आम्ही पटसंख्या वाढवून वाचवले आहेत. तालुक्यातील अनेक शाळांची पटसंख्या वाढत आहे ही मोठी आश्वासक गोष्ट म्हटली पाहिजे.

■

## 'अणिबे'

किती तरी वर्षे झाली. म्हैसूरला गावाबाहेरच्या आमच्या घराला लागून असलेल्या विस्तीर्ण मैदानात चिमुकली, साधी, पण शुभ्र भूछत्रे श्रावणात हजारोंनी उगवून वर आली होती. बाकीची जागा हिरव्या गवताने भरलेली. पण हा भाग तेवढा या भूछत्रांनी आच्छादून गेलेला. वाऱ्याबरोबर त्यांचा तो विशिष्ट उग्र वासही हवेत मिसळला होता. माझी कूर्गप्रांतीय मैत्रीण व मी फिरता फिरता तेथेच थांबलो. तिचा चेहरा हर्षाने फुलून गेला होता.

"चला, आपण ती तोडूं." ती म्हणाली. मला पहिल्याने हात लाववेना. पण मागाहून मीही बरीच छत्रें तोडून गोळा केली.

"यांना काय म्हणतां तुम्ही?" मी विचारले.

ती म्हणाली, "आम्ही यांना 'अणिबे' म्हणतो. ब्राह्मण लोक नाक मुरडतात यांना. पण यांची भाजी म्हणजे आम्हाला एक मेजवानी वाटते. तुम्ही काय म्हणता यांना?" तिने प्रतिप्रश्न केला. मला आपले सुप्रसिद्ध मराठी नाव सांगायला लाज वाटली!

"आम्ही छत्र्या म्हणतो त्यांना. पावसाच्या छत्र्या. पण आमच्याकडे यांना फारसं कुणी शिवतही नाही.

पण तेव्हापासून मी या छत्र्यांना 'अणिबे' असेच नाव दिले आहे. मला ते फार आवडते. नुकतेच कळले की, मराठीत व कोकणीत या छत्र्यांना 'अळमी' असे नाव आहे. तो अणिबेचा अपभ्रंश आहे.

- दुर्गा भागवत ('भावमुद्रा')

# अठराव्या वार्षिक सर्वसाधारण सभेचे इतिवृत्त

आनन्द काटीकर

मराठी अभ्यास परिषदेची २०१३-१४ ह्या आर्थिक वर्षासाठी अठरावी वार्षिक सर्वसाधारण सभा, रविवार, दि० २९ जून, २०१४ला सायंकाळी ठीक ५ वाजता प्रा० प्र०ना० परांजपे ह्यांच्या अध्यक्षतेखाली आयोजित करण्यात आली होती. एस०एम० जोशी सभागृहाच्या आवारातील चर्चासत्र सभागृहात झालेल्या ह्या सभेला १४ सदस्य उपस्थित होते.

सभेच्या प्रारंभाच्या नियोजित वेळेला आवश्यक गणसंख्या नसल्याने सभा स्थगित करण्यात आली. त्यानंतर ठीक ५.३० वाजता सभा सुरू झाली.

सभेच्या प्रारंभी कार्यवाह डॉ० आनन्द काटीकर यांनी सर्व सभासदांचे स्वागत केले. त्यांनतर ह्या आर्थिक वर्षात दिवंगत झालेल्या सर्व मान्यवरांना व संस्थेच्या सभासदांना श्रद्धांजली वाहिली गेली आणि मग सभेच्या कामकाजास सुरुवात झाली.

सर्वप्रथम २०१२-१३ ह्या आर्थिक वर्षाच्या सतराव्या वार्षिक सर्वसाधारण सभेचे इतिवृत्त कार्यवाह डॉ० काटीकर ह्यांनी वाचून संमतीसाठी सभागृहापुढे ठेवले. उपस्थित सभासदांनी ते कायम करण्यास मान्यता दिली. सूचक डॉ० नीलिमा गुंडी व अनुमोदक डॉ० मृणालिनी शहा होत्या.

त्यानंतर कार्यवाह डॉ० काटीकर ह्यांनी २०१३-१४ ह्या वर्षाचे कार्यवृत्त वाचून दाखवले. ह्या वर्षात संस्थेची पंचवार्षिक निवडणूक बिनविरोध पार पडली. त्याबद्दल उपस्थित सभासदांनी समाधान व्यक्त केले. कार्यवृत्ताला सर्व सदस्यांनी मान्यता दिली. सूचक श्री० अरविंद नवरे तर अनुमोदक श्री० नरेंद्र आपटे होते.

संस्थेचे आर्थिक विषय कोषाध्यक्ष श्रीमती विजया चौधरी ह्यांनी मांडले. त्यांनी उपस्थितांना लेखापरीक्षकाने तपासलेले २०१३-१४ ह्या आर्थिक वर्षाचे जमाखर्चपत्रक आणि ताळेबंद संमत करण्याची विनंती केली. श्रीमती चौधरी ह्यांनी २०१४-१५ ह्या आर्थिक वर्षाचा अर्थसंकल्पही मांडला. जमाखर्च पत्रक, ताळेबंद व अर्थसंकल्प सर्वानुमते मान्य करण्यात आले. सूचक डॉ० सरोजा भाटे होत्या, तर अनुमोदक डॉ० नीती बडवे होत्या.

२०१४-१५ ह्या आर्थिक वर्षाकरता लेखापरीक्षकाची व कायदेविषयक सल्लागाराची नेमणूक करणे आणि त्यांचे मानधन ठरवणे, हा अधिकार नेहमीप्रमाणे कार्यकारी मंडळालाच असावा, अशी सूचना डॉ॰ कल्पना कुलकर्णी ह्यांनी मांडली, ती डॉ॰ प्रमोद तलगेरी ह्यांच्या अनुमोदनानंतर सर्वानुमते मान्य करण्यात आली. त्यानुसार श्री॰ पराग देशपांडे यांची कायदेविषयक सल्लागार म्हणून तर दिघे आणि कंपनी यांची लेखापरीक्षक म्हणून वार्षिक नियुक्ती करण्यास सभेने मान्यता दिली. कायदेविषयक सल्लागार श्री॰ देशपांडे ह्यांना प्रतिवर्षी रु॰ ५०००/- स्थिर मानधन देण्याचे ठरले. ह्यासाठी डॉ॰ कल्पना कुलकर्णी ह्या सूचक होत्या, तर डॉ॰ तलगेरी अनुमोदक होते.

त्यानंतर २०१३-१४ ह्या वर्षात पार पडलेल्या पंचवार्षिक निवडणुकीचा अहवाल कार्यवाह डॉ॰ काटीकर ह्यांनी सादर केला. त्यामध्ये त्यांनी निवडणूक अधिकारी म्हणून काम पाहिलेल्या डॉ॰ अरविंद नवरे ह्यांचे आभार मानले. संस्थेचे अध्यक्ष प्रा॰ परांजपे ह्यांच्या हस्ते त्यांचा सत्कार करण्यात आला.

संस्थेच्या पंचवार्षिक निवडणुकीनंतर संस्थेच्या कार्यकारिणीतून मुक्त झालेल्या डॉ॰ मृणालिनी शहा आणि डॉ॰ नीलिमा गुंडी ह्यांनी आजवर संस्थेच्या वाटचालीत दिलेल्या भरीव योगदानाबद्दल कार्यवाह डॉ॰ काटीकर ह्यांनी त्यांचे आभार मानले. ह्या दोघी कार्यकारी मंडळात नसल्या तरी त्यांनी संस्थेच्या प्रगतीसाठी नेहमीच संस्थेच्या सोबत राहावे, अशी विनंती कार्यवाह डॉ॰ काटीकर ह्यांनी सर्व उपस्थितांच्या वतीने केली. संस्थेचे अध्यक्ष प्रा॰ परांजपे ह्यांच्या हस्ते त्यांचा विशेष सत्कार करण्यात आला.

आयत्या वेळेस कोणतेही विषय न आल्यामुळे माननीय अध्यक्षांच्या परवानगीने सभा संपल्याचे जाहीर करण्यात आले.

■

# एकोणिसाव्या वार्षिक सर्वसाधारण सभेचे इतिवृत्त

आनन्द काटीकर

मराठी अभ्यास परिषदेची २०१४-१५ ह्या आर्थिक वर्षासाठीची एकोणिसावी वार्षिक सर्वसाधारण सभा, रविवार, दि० १२ जुलै, २०१५ रोजी दुपारी ठीक ४ वाजता गरवारे वाणिज्य महाविद्यालय, महर्षी कर्वे रस्ता, पुणे येथे झाली. संस्थेच्या उपाध्यक्ष प्रा० सरोजा भाटे ह्या अध्यक्षस्थानी होत्या. सभेला एकूण १५ सदस्य उपस्थित होते.

सभेच्या नियोजित वेळेला आवश्यक गणसंख्या नसल्याने सभा स्थगित करण्यात आली. त्यानंतर ती ठीक ४.३० वाजता सुरू झाली.

सभेच्या प्रारंभी कार्यवाह आनन्द काटीकर ह्यांनी सर्व सभासदांचे स्वागत केले. त्यांनतर ह्या आर्थिक वर्षात दिवंगत झालेल्या सर्व मान्यवरांना व संस्थेच्या सभासदांना श्रद्धांजली वाहिली गेली आणि मग सभेच्या कामकाजास सुरुवात झाली.

सर्वप्रथम २०१३-१४ ह्या आर्थिक वर्षाच्या अठराव्या वार्षिक सर्वसाधारण सभेचे इतिवृत्त उपलब्ध नसल्याबद्दल कार्यवाह आनन्द काटीकर यांनी सभेची क्षमा मागितली. त्यावर हे इतिवृत्त पुढील वर्षीच्या सभेत सादर करावे, अशी सूचना अरविंद नवरे ह्यांनी केली. या सूचनेला विजय पाध्ये यांनी अनुमोदन दिले. सर्व सभेने त्यास मान्यता दिली.

त्यानंतर कार्यवाह आनन्द काटीकर यांनी २०१३-१४ या वर्षाचे कार्यवृत्त वाचून दाखवले. या कार्यवृत्तात दिलेल्या 'भाषा आणि जीवन' या नियतकालिकासंदर्भातील तपशीलाबाबत डॉ० गुंडी यांनी सूचवलेल्या सुधारणा मान्य करून सर्व सदस्यांनी कार्यवृत्त संमत केले. सूचक – अरविंद नवरे व अनुमोदक – विजय पाध्ये होते.

संस्थेचे आर्थिक विषय कोषाध्यक्ष विजया चौधरी ह्यांनी मांडले. त्यांमध्ये त्यांनी सर्वांना लेखापरीक्षकाने तपासलेले २०१४-१५ ह्या आर्थिक वर्षाचे जमाखर्चपत्रक आणि ताळेबंद संमत करण्याची विनंती केली. सर्वांनी संमती दिल्यामुळे २०१५-१६ ह्या आर्थिक वर्षाचा अर्थसंकल्पही विजया चौधरी ह्यांनी मांडला आणि तो सर्वानुमते मान्य करण्यात आला.

सूचक – नीलिमा गुंडी; अनुमोदक – अपर्णा झा

२०१५-१६ ह्या आर्थिक वर्षाकरिता लेखापरीक्षकाची व कायदेविषयक सल्लागाराची नेमणूक करणे आणि त्यांचे मानधन ठरवणे, हा विषय चर्चेला आला. दरवर्षीप्रमाणे श्री॰ पराग देशपांडे ह्यांची कायदेविषयक सल्लागार म्हणून तर दिघे आणि कंपनी ह्यांची लेखापरीक्षक म्हणून वार्षिक नियुक्ती करण्यास सभेने मान्यता दिली.

सूचक – नीलिमा गुंडी; अनुमोदक – मयूर गोहाड

आयत्या वेळेस आलेल्या विषयांमध्ये 'भाषा आणि जीवन'च्या जुन्या अंकांची लवकरात विक्री करावी अथवा ते अंक उत्तम वाचनालयांना भेट म्हणून पाठवावे, अशी सूचना मृणालिनी शहा यांनी केली. अध्यक्षांसह अनेक सदस्यांनी ह्या सूचनेला दुजोरा दिला. मराठीच्या लेखनविषयक नियमांवर एक चर्चासत्र आयोजित करावे, अशी सूचना विजय पाध्ये यांनी केली. मराठी भाषा अध्यापक संघाशी संपर्क करून शालेय पातळीवर विविध भाषिक उपक्रम राबवण्यात संस्थेने पुढाकार घ्यावा, असे मत मांडण्यात आले. विंदा करंदीकर ह्यांच्या बालकवितांचे सादरीकरण आणि त्यावर चर्चा असे कार्यक्रम संस्थेने आयोजित करावे. त्यायोगे नवनवे विद्यार्थी आणि तरुण संस्थेकडे आकर्षित होऊ शकतील, अशीही चर्चा ह्या निमित्ताने झाली. त्यानंतर माननीय अध्यक्षांच्या परवानगीने चहापानानंतर सभा संपल्याचे जाहीर करण्यात आले.

■







अनुक्रमणिका

# 'मराठी' आता महाराष्ट्राची अधिकृत राजभाषा

महाराष्ट्र राजभाषा अधिनियम १९६४मधील कलम १मध्ये संक्षिप्त नाव, विस्तार व प्रारंभ ह्यात मराठी राजभाषा असल्याचा कुठेही सुस्पष्ट उल्लेख नसल्यामुळे अधिनियमात सुधारणा करणारे महाराष्ट्र राजभाषा (सुधारणा) अधिनियम २०१५ हे विधेयक राज्याच्या विधानसभेत संमत करण्यात आले आहे.

महाराष्ट्र अधिनियमात 'मराठीविषयी जिचा अंगीकार केला आहे अशी देवनागरी लिपीमधील मराठी भाषा असा समजावा असा' संदिग्ध उल्लेख केलेला होता.

(दै० लोकसत्ता, दि० २५ जुलै २०१५)

# ग्रंथालयातर्फे शब्दशोध स्पर्धा

सांगलीच्या यशवंतराव ग्रंथालयाने यंदाच्या मे महिन्यात एक अभिनव उपक्रम म्हणून 'शब्दशोध स्पर्धा' आयोजित केली होती. (लोकसत्ता, दि० २३ मे, २०१५), मराठी भाषेच्या संवर्धनाच्या दृष्टीने ही अतिशय प्रेरणादायी व उत्साहवर्धक घटना मानली जावी. शासन, मराठी अभ्यास परिषद, महाराष्ट्र साहित्य परिषदवगैरेंसारख्या संस्थांतर्फे योजल्या जाणाऱ्या उपक्रमांपेक्षा एखाद्या ग्रंथालयातर्फे असा उपक्रम राबवला जावा, हे कौतुकास्पद म्हटले पाहिजे. कालौघात अनेक शब्द नष्ट होणे, नवीन शब्द तयार होणे, जुन्या शब्दांना नवीन अर्थ प्राप्त होणे ह्या गोष्टी सर्वच भाषांमध्ये घडत असतात. परंतु जुने, वैशिष्ट्यपूर्ण शब्द टिकवून ठेवले पाहिजेत, नष्ट झाले असले तर ते परिश्रमपूर्वक पुन्हा वापरात आणले गेले पाहिजेत. त्यामुळे सांस्कृतिक वारसा जपण्याचे महत्त्वाचे कार्य घडत असते. ज्येष्ठ भाषा अभ्यासक व लेखक डॉ० वा०के० लेले ह्यांनी 'जन्या मराठी शब्दांचे पुनरुज्जीवन' नावाच्या लेखात (संदर्भ: 'भाषा: स्वरूप, सामर्थ्य व सौन्दर्य', राजहंस प्रकाशन, पुणे) अशा कितीतरी शब्दांची अर्थासह भलीमोठी यादीच दिली आहे. त्यातल्या पंक्तिभाऊ, पखाल पार्वती, पद्महस्ती, नक्षत्रमाळ, नभश्चुंभक, धनचळ, त्रेसष्टी, थेटखरेदी ह्यांसारखे अनेक शब्द मराठीचे शब्दवैभव सिद्ध करतात.

- विजय पाध्ये





अनुक्रमणिका

.१.

## सारंगांच्या 'एका कोळियाने'वरील परखड परीक्षणासंबंधी...

हिवाळा २०१५ अंकातील प्र॰ना॰ परांजपे ह्यांचे विलास सारंग ह्यांच्या कार्याची दखल घेणारे संपादकीय वाचले. त्यातील 'हेमिंग्वेच्या दि ओल्ड मॅन अँड द सी या कादंबरीच्या पु॰ल॰ देशपांडे यांनी केलेल्या 'एका कोळियाने' या भाषांतराचे सारंगांनी केलेले परखड परीक्षण 'सत्यकथे'च्या वाचकांना विसरता येणार नाही' हे वाक्य संदर्भाविना दिले गेल्याने अपुरे ठरते. 'भाषा आणि जीवन'च्या वाचकांना 'सत्यकथे'तील परीक्षण वाचायला मिळाल्याखेरीज विलास सारंगांच्या परखडपणाचे दर्शन होत नाही आणि त्यामुळे सदर संपादकीय लेखनाचा नेमका बोध होत नाही.

- वि॰शं॰ ठकार, पुणे

विलास सारंगांचे सदर परीक्षण 'सत्यकथे'च्या ऑगस्ट १९७१च्या अंकात 'म्हातारा आणि समुद्र – आणि बारके बारके शार्क' ह्या नावाने प्रसिद्ध झाले होते आणि तोच लेख सारंगांच्या 'अक्षरांचा श्रम केला' ह्या लेखसंग्रहात (प्रकाशक : मराठी विभाग, मुंबई विद्यापीठ व मौज प्रकाशन गृह, मुंबई) ग्रथित करण्यात आला आहे. संपादकीयातील त्रुटीबद्दल क्षमस्व.

- संपादक

.२.

## कॅरेट

कॅरट/कॅरेट? Eng Dictionary

कॅरेट हे परिमाण सोने, हिरे ह्यांसारख्या किमती धातूंची गुणवत्ता मोजायला वापरले जाते अशी आजपर्यंत आमची समजूत होती! २४ कॅरेट सोनं म्हणजे पूर्ण शुद्ध सोनं!! म्हणजे, २४ कॅरेटच्या वर कॅरेट हे परिमाण जाऊ शकत नाही! पण माध्यमांनी हे परिमाण अगदी १००० कॅरेटपर्यंत सुद्धा नेलेले दिसते!! हे परिमाण आता 'फळभाज्यांचे परिमाण' म्हणून वापरले जाते असे अलीकडेच वर्तमानपत्रांतून समजले. भाजी मंडईसंबंधीच्या बातमीत 'काल फक्त ६८० कॅरेट टमाटेच मंडईत आले!!' अशी ती बातमी आहे.

- राजेश पाटील, पुणे

'ॲग्रोवन' नावाचे जे कृषिविषयक वर्तमानपत्र आहे, त्याच्यात क्रेटऐवजी कॅरेट असा शब्दप्रयोग केला असल्याचे आढळून येते. २ सप्टेंबर २०१०च्या 'ॲग्रोवन'मध्ये 'टोमॅटोची ४२५ कॅरेट आवक होती. टोमॅटोस २५ ते १५० प्रति दहा किलो इतका दर होता. ओला वटाण्याची ११२ पोती इतकी आवक होती...' असा उल्लेख केलेला होता.

डॉ॰ बावसकर टेक्नॉलजी डॉट कॉम ह्या संकेतस्थळावर डाळिंबाच्या उत्पादनासंबंधी एका शेतकऱ्याने आपला जो अनुभव नोंदवला आहे, त्यातदेखील 'सेटिंग अवस्थेत अप्रतिम रिझल्ट मिळाला. ...फळांना कलर येऊन आकारमान, वजन वाढलेले जाणवले; ऑगस्टच्या शेवटच्या आठवड्यात माल संपला. एकंदरीत ५५० कॅरेट (Crate) माल निघाला. ह्यावरून क्रेट ह्या रूढ संकल्पनेला सर्वसामान्य माणसे जरी हारा, टोपली वगैरे शब्द योजत असली, तरी नवीन पिढीत क्रेटला कॅरेट म्हणणे भारदस्त, प्रौढी मिरवण्याजोगे वाटत असणार. ज़ुन्या पिढीतल्या अर्धशिक्षित किंवा अशिक्षित माणसांनी कदाचित क्रेटचे मराठमोळे रूप 'कारटं' असेदेखील केले असते की नाही? देणाऱ्यांनी देतादेता एक दिवस घेणाऱ्यांची भाषा घेतली आहे असे म्हणता येईल!

टोपल्या टिकाऊपणात टिकल्या नाहीत म्हणून क्रेट आले. कंटेनरमध्ये क्रेट विशिष्ट संख्येने बसतात. त्यावरून त्याचे दळणवळणाचे (आणि वस्तूंचेही) दर ठरतात. घाऊक, ठोक व्यापारी आता फळभाज्या, फुले क्रेटच्या परिमाणात मोजतात. त्यातून ही पारिभाषिक संज्ञा तयार झाली असावी. मंडई विद्यापीठाची मराठी भाषेला ही एक नवीन देणगी!

- संपादक

साद-प्रतिसाद ह्या सदरात 'भाषा आणि जीवन'मध्ये प्रसिद्ध झालेल्या लेखनाविषयीची तसेच इतरत्र नजरेस येणाऱ्या भाषाविषयक उल्लेखांविषयीची टिपणी प्रसिद्ध केली जाईल. वाचकांच्या शंकांचे समाधान करणाऱ्या टिपणीलाही स्थान दिले जाईल.





अनुक्रमणिका

# लेखक-परिचय

**काटीकर**, आनन्द : मराठीमध्ये एम॰ए॰, पीएच॰डी॰, औषधिनिर्माण शास्त्राची पदविका. गेली काही वर्षे फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे येथे मराठीचे अध्यापन. सध्ये राज्य मराठी विकास संस्था, मुंबई येथे प्रभारी संचालक म्हणूनही कार्यरत. मराठी अभ्यास परिषदेचे कार्यवाह.

टपाल-पत्ता : B-5/16 सनसिटी, सिंहगड रस्ता, आनंदनगर, पुणे 411 051.
चलभाष :
ई-पत्ता : anand.katikar@gmail.com

**काळेले**, श्रद्धा : काळेले, श्रद्धा : एम॰ए॰ (इंग्रजी), एम॰ए॰ (भाषाविज्ञान); सध्या सीडॅक, पुणे येथे वरिष्ठ तांत्रिक अधिकारी म्हणून कार्यरत. त्याआधी भारतीय तंत्रज्ञान संस्था (आयआयटी) मुंबई येथील भारतीय भाषा केंद्रात भाषातज्ज्ञ म्हणून सेवेत. मराठी शाब्दबंध तसेच बहुभाषिक कोशावरील कामात सहभाग.

टपाल-पत्ता : A702 प्रिस्टीन फॉटेना, मराठा मंदिराच्या मागे, बावधन, पुणे 411 021.
चलभाष : 097665 42256

**घोलप**, दत्तात्रय : एम॰ए॰, पीएच॰डी॰ (मराठी). विविध नियतकालिकांमधून वाङ्मयविषयक लेख प्रसिद्ध. काही काळ मराठीचे अध्यापन. 'सामाजिक-सांस्कृतिक स्थित्यंतरे आणि मराठी कादंबरीचे बदलते रूप' ह्या संशोधन प्रकल्पासाठी यूजीसीकडून पोस्ट-डॉक्टरल फेलोशिप.

टपाल-पत्ता : मु॰ दडशिंगे, पोस्ट सौंदरे, तालुका बार्शी, जिल्हा सोलापूर 413 401.
चलभाष 098506 86094
ई-पत्ता : dpgholap@gmail.com

**चौधरी**, विजया : मुंबई विद्यापीठातून एम॰ए॰ (मराठी), पंजाब नॅशनल बँकेच्या अधिकारपदावरून स्वेच्छानिवृत्त. 'स्त्री-साहित्याचा मागोवा'च्या तिसऱ्या खंडामध्ये लेखन-सहयोग. मराठी अभ्यास परिषदेच्या कार्यकारी मंडळाच्या सदस्य.

टपाल-पत्ता : E-503 पर्वतीनगर, विठ्ठलवाडी, जकातनाक्याजवळ, सिंहगड रस्ता, पुणे 411 030.
स्थिरभाष : (020)2425 0559
चलभाष : 099236 71820
ई-पत्ता : vijayachaudhari11@gmail.com

**देवळेकर**, सुशान्त : एम॰ए॰ (मराठी), सध्या राज्य मराठी विकास संस्था (मुंबई) येथे कनिष्ठ संशोधक साहाय्यक ह्या पदावर कार्यरत. मराठी 'शाब्दबंध' हा शब्दार्थसंबंध दाखवणारा कोश व मराठी शब्दरूपांचे विश्लेषण करणारी 'रूपविश्लेषक' ही संगणक प्रणाली विकसित करण्यात सहभाग. संगणकावर यूनिकोड वापरून मराठीत काम कसे करता येते हे समजावून देणाऱ्या कार्यशाळांत मार्गदर्शन.

टपाल-पत्ता : D-605 सुबोधनगर वसाहत, श्रीप्रस्थ चौथा मार्ग, निळेमोरे, नालासोपारा, ता॰ वसई, जि॰ ठाणे 401 203.
चलभाष : 097698 35310
ई-पत्ता : sushant.devlekar@gmail.com

**बडवे**, नीती : जर्मन भाषा व साहित्य ह्या विषयात एम॰ए॰, पीएच॰डी॰. पुणे विद्यापीठाच्या परकीय भाषा विभागातून प्रोफेसर म्हणून निवृत्त. विदेशी विद्यार्थ्यांना मराठी शिकवण्याचा अनुभव. लर्निंग मराठी ॲज अ फॉरिन लॅंग्विज (भाग १ व २)चे लेखन.

टपाल-पत्ता : 5 संयोगिता, 897 शिवाजीनगर, पुणे 411 004.
चलभाष : 094223 14519
ई-पत्ता : neetibadwe@gmail.com

**भोसले**, द॰ता॰ : भोसले, द.ता. : एम.ए., पीएच. डी. अनेक महाविद्यालयांत मराठीचे प्राध्यापक तसेच प्राचार्य म्हणून कार्यरत (आता निवृत्त). दलित आणि ग्रामीण साहित्यात विशेष मान्यता पावलेले लेखक. लोकजीवनावरील व लोकसंस्कृतीवरील साहित्याच्या निर्मितीत भरीव व मोलाचे योगदान. कादंबऱ्या, कथासंग्रह, ललितलेख, वैचारिक ग्रंथ, समीक्षा, चरित्रपर ग्रंथ, संपादित ग्रंथ, ग्रामीण बोलींचे शब्दकोश वगैरे विपुल साहित्य प्रकाशित.

टपाल-पत्ता : भोसले बंगला, हॉटेल नागालॅंडमागे, डाकबंगल्याजवळ, पंढरपूर 413 304.
चलभाष : 094226 46855

**मोहनी**, दिवाकर : मुद्रणतज्ज्ञ, लिपीतज्ज्ञ, विवेकवादाला वाहिलेल्या 'आजचा सुधारक' ह्या नियतकालिकाच्या संपादक-मंडळाचे सदस्य.

टपाल-पत्ता : 'गौरीनंदन', 123 शिवाजीनगर, नागपूर 440 010.
चलभाष : 098819 00608

**सामंत**, वि॰दा॰ : एम॰एससी॰ (टेक - पॉलिमर तंत्रविद्या). संशोधन व विकास अधिकारी म्हणून पाच वर्षे नोकरी. त्यानंतर रासायनिक अभियंता/तंत्रज्ञ ह्या नात्याने

प्लास्टिक उद्योगात उत्पादन, विकास व संशोधन ह्या क्षेत्रात दीर्घकाळ तांत्रिक सल्लागार म्हणून सहभाग. भाषाविषयात – विशेषतः मराठी, संस्कृत ह्यांमध्ये प्रथमपासूनच स्वाभाविक रुची असल्याने अलीकडे काही वर्षे संपादन व मुद्रितशोधन ह्यांत कार्यरत.
टपाल-पत्ता : १६ यशोदाकुंज सोसायटी, तेजसनगर, कोथरूड, पुणे 411 038.
स्थिरभाष : (020)2538 3755
चलभाष : 096042 74131

**मुखपृष्ठाविषयी** : फुले-पाने विशिष्ट पद्धतीने वाळवून त्यांपासून रचना केलेल्या पुष्पचित्रांना ‘ओशिबाना’ असे म्हणतात. ओशिबाना व इकेबाना ह्या दोन्ही कलाशैलींचा वापर करून तयार केलेले हे चित्र ‘पूर्वाभिमुख’ ह्या चित्रमालिकेतून निवडले आहे. चित्रकार : सलील वाघ. चित्रकाराचे संपर्क-तपशील पुढीलप्रमाणे –
टपाल पत्ता : 81 कसबा पेठ, कसबा गणपती मंदिराजवळ, पुणे 411 011.
चलभाष : 094225 11238
ई-पत्ता : saleelwagh@gmail.com



